# दलितकुसुम.

ही कादंबरी

कै. रा. रा. अनंत केशव चितळे

व

नारायण रामचंद्र गोखले

यांनीं लिहिली

ती

चितळे आणि मंडळी, वांई

यांनीं

वांई येथें " मोदवृत्त " छा. छा.

प्रसिद्ध केली.



किंमत १२ आणे.



# प्रस्तावना.

प्रस्तुत कादंबरी मूळ बंगाली असून तिचे कर्ते श्रयुित **बाबू नारायणदास मौलिक** होत. तिचें भाषांतर **श्रीकार्तिकप्रसाद** यांनीं हिंदींत केलें आहे व तविरून ही मराठी भाषेंत आली आहे.

सृष्टीमध्यें साधारणतः एकानें आरंभिलेलें कार्य त्याच्याच हातून तडीस जातें. या नियमाला अपवादही बरेच आहेत. सुप्रसिद्ध '**कादंबरी**' **बाण**कवि लिहीत असतां मरण पावला. पुढें ती त्याच्या पुत्रानें शेवटास नेली. अरेबियननाईट्सूचें भाषांतर कै. **कृष्णशास्त्री चिपळूणकर**, कै. **विष्णुशास्त्री चिपळूणकर** व रा. **दामळे** या तिघांच्या हातून पार पडलें. त्याप्रमाणें प्रस्तुत पुस्तकाचीही स्थिति आहे.

आपण हातीं घेतलेलें काम शेवटास न जातां हा लोक सोडून आपणास जावें लागेल असें वरील कोणाही गृहस्थास वाटलें नाहीं. त्याप्रमाणें कै. ती. रा. रा. **चितळे** यांसही वाटलें नव्हतें. पण ईश्वरीच्छा त्यांना मोडतां येईना. ते हें काम अर्धवटच टाकून चालते झाले. माझा व त्यांचा फार सहवास असल्यानें त्यांचें काम तसेंच अर्धवट रहावें असें मला वाटेना. शिवाय, ही कांदबरी उत्तम व बोधपर असल्यामुळें '**कल्पद्रुम**' द्वारें अवश्य प्रसिद्ध व्हावयास पाहिजे असें वाटून त्यांनीं केलेलें भाषांतर छापून बाकीचें मीं शेवटास नेलें.

ह्या कादंबरींतील विषय नेहेमीं दृष्टीस पडण्यापैकीं आहे त्यांत कांहीं काल्पनिक नाहीं. पातिव्रत्य कोणच्याही देशांत व कोणच्याही मनुष्यांत पूज्यच मानलें जातें. विशेषतः हिंदु स्त्रियांच्या पातिव्रत्याची फार ख्याति आहे. हिंदु स्त्रियांना पातिव्रत्य किती प्रिय असतें याचें उदाहरण कुसुमचें चरित्र होय.

अलीकडे स्त्रीशिक्षणाविषयीं लोकमत जागृत होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. स्त्रीशिक्षण कशारीतीनें द्यावें याविषयीं जरी मतभेद आहे तरी '**पण लक्ष्यांत कोण घेतो**' '**लीला**' '**कृष्णकांताचें मृत्युपत्र**' अशीं पुस्तकें त्यांच्या हातांत दिल्यास त्यांचें मनोरंजन होऊन त्यांना उपदेशही होणार आहे. स्त्रियांच्या हातांत देण्यासारखीं पुस्तकें फार थोडीं आहेत त्यांतच '**दलितकुसुम**' याची भर घातली आहे. स्त्रियांनीं 'कुसुम'चें चरित्र पुढें ठेवून तद्वत् आचरण केल्यास त्यांस सुखावह होऊन त्या आपल्या दोन्हीं कुलांस शोभवितील.

हें पुस्तक स्त्रियांप्रमाणें पुरुषांनींही वाचनार्ह आहे. या कादंबरींत मधून मधून विचार प्रकट केले आहेत; ते फार चांगले आहेत. परमेश्वराचें अस्तित्व, पैसा, पोटाची काळजी, भाग्य व संगति यांसंबंधीं प्रकट केलेले विचार वाचण्यालायक आहेत. एकंदरींत हें पुस्तक आश्रयदात्यांस प्रिय होईल अशी आशा आहे.

सरतेशेवटीं ज्या परमेश्वराच्या कृपेनें महत्संकटांतून हें काम पार पाडिलें त्याचे शतशः आभार मानून व आमच्या हातून मराठी भाषेची अशीच सेवा घडावी अशी करुणा भाकून हा प्रस्तावना लेख पुरा करितों.

कादंबरीकल्पद्रुम कार्यालय, वांई.
१२–६–१९०२

ना. रा. गोखले.



॥ श्रीः ॥

# दलितकुसुम.

## भाग पहिला.

"बाळे दामिनी, रात्र बरीच झाली. अजून घरांत दिवा नाहींना लावलास ? जरा ओटीवर एक दिवा घेऊन ये पाहूं" याप्रमाणें पित्याचें भाषण ऐकिल्यावर कन्येनें "आणतें बरें दिवा लावून" असें ह्मणून घरांतून एक दिवा लावून बाहेर आणिला.

वृक्षांच्या कोवळ्या डहाळ्यांना झोके देणारा, अर्धवट उमललेल्या सुवासिक पुष्पांचें चुंबन करणारा आणि घरांच्या झरोक्यांतून आंत शिरून कुलवधूंची चेष्टा करणारा सायंकाळचा वारा कोणाचें वस्त्र उडवीत आणि कोणाच्या मुखावरील बुरखा दूर करीत येत असतां त्यानें दामिनीच्या पाठीमागून येऊन चटकन् तिच्या हातांतील दिवा घालविला. तेव्हां "अरेरे, वाऱ्यानें दिवा गेला !" असें ह्मणत ती बिचारी माघारी फिरली आणि मोठ्या सावधपणानें दिवा प्रज्वलित करून घेऊन आली. परंतु हा खेळगडी कसचा ऐकितो. ती दारापावेतों पोहोंचते तोंच त्यानें तो पुन्हां विझविला. तेव्हां तर ती बरीच चिडली आणि "थांबरे गुलामा, आतां कसा विझवितोस तें पाहते" असें ह्मणत ती पुन्हां माघारी फिरली. पुन्हां एकवार दिवा लावून तो चांगला व्यवस्थेनें पदराखालीं घेऊन ती बाहेर आली. ओटीच्या एका कोपऱ्यांत एक ठाणवई उभी होती तीवर तिनें तो दिवा ठेविला आणि एक मोठीशी चटई हंतरून एक तांब्याभ

पाणी आणि एक पुराणा आज्यापणज्यांच्या वेळचा खडावांचा जोड तिनें पित्यापुढें ठेविला. मग म्हातार्‍यानें आपल्या पाठीवरचें गाठोडें उतरून जमीनिवर ठेविलें आणि म्हटलें " बाळे, घरांत थोडीशी तंबाखूतिंबाखू असली तर एक गुडगुडी भरून आण पाहूं. " याप्रमाणें बापाची आज्ञा होतांच कन्येनें एका जुन्या गुडगुडींत तंबाखू भरून तीवर विस्तव ठेवून पित्याकरितां आणून दिली. तेव्हां तिच्या हातांतून गुडगुडी घेऊन गुडगुड शब्दांनीं ती तो ओढूं लागला. आणि इकडे कन्या आपल्या डोक्यावरील पदर सांवरून व कांहींशी तिरपी वळून दाराच्या चौकटीला टेकून उभी राहिली.

आज चैत्री पौर्णिमा आहे. चहूंकडे मनाला आल्हाद देणारा चंद्रप्रकाश पडला असून त्याच्या प्रकाशामुळें तारकांचें तेज मंद झालें आहे. कोठेंकोठें दहापांच चांदण्या मिणमिण करीत आहेत त्यावरून असें अनुमान होत आहे कीं, जसजसा चंद्र त्यांचेकडे पाहून हास्य करीत आहे तसतशा त्या बापड्या लाजून आपलें तोंड झांकीत आहेत. आणि रात्रीचे वेळीं आपल्या कोठ्यांत येऊन बसलेले पक्षी प्रातःकाळच्या भ्रांतीनें मधेच उठून शब्द करीत आहेत. सृष्टीची ही शोभा अत्यंत रमणीय असून ती कोणाही मनुष्याचें चित्त वेधविणारी होती. परंतु या सृष्टिसौंदर्याच्या मधुरतेचा उपभोग घेणें सगळ्यांच्याच सारखें नशीबीं असतें असें नाहीं. सृष्टीच्या माधुर्याचा अनुभव हा नेहमीं चित्ताच्या स्थीरतेवर अवलंबून असतो. एखाद्या वस्तूच्या अवलोकनानें एखाद्याचें अंतःकरण प्रसन्न होतें आणि त्याच वस्तूच्या अवलोकनानें दुसऱ्या एखाद्याच्या अंतःकरणाला खेद होतो. आज दामिनीच्या पित्याचीही तशीच स्थिति झालेली आहे. सृष्टीची ती अत्यंत मनोहर शोभा त्याला तापदायक वाटत आहे. सुंदर चंद्रप्रकाशही त्याला काळोख्या रात्रीच्या घोर अंधाराप्रमाणें वाटत आहे. ही त्याची बाह्यस्थिति झाली; अर्थात् त्याच्या अंतःकरणाचीही अशीच स्थिति झाली असली पाहिजे. खरोखर

त्याच्या हृदयरूपी सागरांत अनेक चिंतारूपीं लाटा उसळत आहेत. तो आपल्या मनांतल्या मनांत न जाणे कित्येक गोष्टी रचीत आहे आणि कित्येक विसकटून टाकीत आहे. त्याचें चित्त घोर चिंतेनें व्याप्त झाल्यामुळें तो अगदीं विव्हळ होऊन गेला आहे. दिसण्यांत तो हुक्का पीत आहे खरा, परंतु त्याच्या हुक्यांतील तंबाखू जशी जळत आहे तसाच तो मनांतल्या मनांत जळत आहे. खरोखर चिंता ही एक मोठी भेसुर वस्तु आहे. एका कवीनें ह्मटलें आहे:—

**चिता चिंता समानास्ति बिन्दुमात्र विशेषतः ।**
**सजीवं दहते चिंता निर्जीवं दहते चिता ॥ १ ॥**

हें खरें आहे.

बराच वेळपर्यंत तो ह्मातारा मुकाट्यानें बसला होता. परंतु आतां त्याच्यानें बोलल्यावांचून राहवेना ! खेदपूर्वक एक दीर्घ श्वास सोडून तो बोलूं लागला. तो ह्मणाला “ बाळे दामिनी, या ह्मातारपणांत आतां माझ्यानें इतके कष्ट नाहीं सहन होत. रात्रंदिवस कपाळाला घाम आणून कोणत्या कष्टानें मी दोन पैसे कमवून आणतो आणि इकडे आमचे आज्ञाधारक( !)पुत्र तें सर्व एक्या चुटकीसारखें उडवून टाकतात ! आतां माझें ह्मातारपण झालें. दुधातुपाची गोष्ट एकीकडे असो; पण मनाजोगी ओली कोरडी रोटी जरी मिळाली तरी मोठें भाग्य समजावयाचें. जेथपर्यंत हीं पुराणीं हाडें चालताहेत तेथपर्यंत ठीक आहे. नाहींतर त्या मूर्खाला उपाशींच मरण्याची पाळी येणार आहे. त्याच्या हातीं पैसा न लागावा ह्मणून मी शतशः उपाय करून पाहिले; परंतु त्या सामर्थ्यापुढें माझा कांहींएक उपाय चालत नाहीं. त्याला जणो रुपयांचा वास येऊन ते जेथें असतील तेथून तो शोधून काढितो ! परवा पहातां पहातां दोन रुपये विनाकारण उडविलेन. असला कुपुत्र माझ्या पोटीं कोठून आला कोण जाणें ? मला मोठी आशा होती कीं, हा मोठा झाल्यावर चांगला निघून दोन पैसे कमवील आणि ह्मातारपणीं माझे पांग फेडील ! परंतु ती माझी आशा

तर एकीकडेसच राहिली; उलट जिवाची आटापीट करून मी जें काय मिळवितो त्यावरच हे राजेश्री डल्ला मारतात! लोक ह्मणाले, त्याचें लग्न करून द्या ह्मणजे पायांत बिडी पडल्यावर तो आपोआपच शुद्धीवर येईल. मलाही तें त्यांचें ह्मणणें खरें वाटलें. इकडे तिकडे खटपट करून त्याचें लग्नही केलें. लग्नाला चांगला दीडशें रुपयांचा वाटवा रिकामा केला. पण मला आज असें वाटूं लागलें आहे कीं, ते रुपये जर मजपाशीं शिल्लक असते तर फार चांगलें झालें असतें. आजवर कोणापाशीं व्याजीं लाविलें असतें तर थोडें बहूत व्याज तरी मिळतें. खरोखर त्याचें लग्न करून देऊन मी निव्वळ फसल्यासारखा झालों आहें.

**दामिनी**—तुह्मी जे एकदां त्याला रागें भरणें सोडून दिलें ते दिलें. त्यावर आतां कधीं एक शब्दही बोलत नाहीं. अशानें तर तो अधिकच बिघडत चालला आहे.

**पिता**—खासें सांगितलेंस! मी त्याला बोलत नाहीं तेंच बरें आहे, नाहींतर या ह्मातारपणांत राहिली साहिली इज्जत गमवून बसणें नशिबीं यावयाचें. त्या दिवशीं पाहिलें नाहींस. मी कोठें एवढेंसें बोलावयास गेलों तों तो कसा हिरवा पिंवळा झाला तो? मीच आपला होतो ह्मणून त्यावेळीं गप्प बसलों. नाहींतर त्यानें कांहीं बाकी कां ठेविली होती.

**दामिनी**—पूर्वी कांहीं तो असा नव्हता. एकाएकीं न जाणे त्याची मति इतकी कां पालटली ती? मला वाटते त्या अवदसेनें कांहीं चेटुक तर नाहींना केलें?

**पिता**—मला तर कांहीं सुचत नाहीं. खरेंच पूर्वी त्याचें वर्तन सरळ असे. पण या अलीकडच्या तीन महिन्यांत सारा रंग बदलला. अजूनपर्यंत त्याला दारूची मात्र चटक लागलेली दिसत नाहीं.

**दामिनी**—नाहीं; मी पुष्कळ लोकांच्या तोंडून ऐकिलें आहे कीं, त्याच्या हातून तेव्हढी गोष्ट घडली नाहीं. आणि घडणार कोठून? त्याला पुष्कळ पैसे पाहिजेतना?

**पिता**—देव जाणे !

**दामिनी**—वहिनी माहेरीं गेल्यापासून तर तो फारच बिघडत चालला आहे. ती येथें असतां तो दिवसाचा पाहिजे तिकडे फिरे; पण रात्रीं तरी नेमानें घरीं येई. मला वाटतें, वहिनीला इकडे बोलवून घेतलें असतां बरें होईल.

**पिता**—तूं ह्मणतेस तें खरें. मी उद्यांच कांहीं तरी तजवीज करितों. सध्यां माझ्या हातीं पैसा नाहीं तरी पण या कामाकरितां कोणाचें तरी उसनें काढीन. असें तरी तो रोजच्या रोज पैसे खराब करितोच आहे त्यापेक्षां आपणच एकदम दहापांच रुपये खर्च केलेले बरे.

**दामिनी**—अदमासें किती रुपये लागतील.

**पिता**—चांगले दहा बारा रुपये तरी पाहिजेत. सुनेचें माहेर येथून बरेंच दूर आहे. आणि त्यांतूनही तो पडला नावेचा रस्ता. कसेंही असो, उद्यां तो घरीं आला ह्मणजे पाहूं तो जर तिला आणावयाला जात असला तर.

वरीलप्रमाणें संभाषण होतां होतां रात्रीचे दहा वाजले. तेव्हां दामिनी पित्यास ह्मणाली “ रात्र फार झाली तुह्मी थोडेसे खाऊन तरी घ्यावयाचें होतें. पडून पडून ताटांत वाढलेल्या अन्नाला पाणी देखील सुटलें असेल. अन्न अगदींच निवून गेल्यावर तें तुमच्यानें खावणार देखील नाहीं. ”

मुलीच्या आग्रहावरून पिता भोजन करावयास बसला. तो पानावर बसला खरा; परंतु त्याच्यानें फारसें कांहीं खाववलें नाहीं. एक तर त्याचें चित्त अस्वस्थ आणि दुसरें पडून पडून अन्नाच्या गारगोट्या झालेल्या; त्यामुळें कसेंबसें जेवण करून ह्मातारा पानावरून उठला.

भोजनोत्तर ह्मातान्यानें पुन्हां एकदां गुडगुडी भरली आणि तिचे एकदोन झुरके घेतल्यावर एक पैशाची पिशवी काढून लक्ष्यपूर्वक तिच्यांतील तो पैसे मोजूं लागला. त्यानें चांगले दोन तीन वेळ ते पैसे मोजले

आणि शेवटीं आपल्याशींच चिडल्यासारखा होऊन तो ते पैसे पिशवींत भरीत असतां ह्मणाला "अरे राम, आज सारे पावणेसात आणेच मिळाले!" कसेबसे पैसे थैलींत भरून ते एका पुराण्या मोडक्या संदुकींत ठेविल्यावर ह्यातान्यानें बिछान्यावर अंग टाकिलें.

इकडे दामिनीचें जेवणखाण तर आटोपलें होतेंच; तथापि ती अजूनपर्यंत निजली नव्हती. ती मुकाट्यानें बसून कोणाची तरी वाट पहात होती. बराच वेळ गेल्यावर तिला कशाची तरी चाहूल लागली. तिनें ऐकलेला ध्वनि इतका हळू होता कीं, तो दुसऱ्या कोणाला कधीं ऐकू आला नसता. परंतु दामिनीच्या कानांत तो तेव्हांच शिरला. तिनें चटकन् उठून दार उघडिलें. दार खुलें होतांच एक सुमारें तीस वर्षांच्या वयाचा मनुष्य आंत शिरला. त्याचा रंग सांवळा असून शरीर बांधेसूत होतें. त्यानें आपल्या डोक्यावरून काळ्या बनातीची पायघोळ घातली होती आणि एका हातांत एक सुरा घेऊन तो दबत दबत पावलें टाकीत दामिनीच्या बिछान्यावर जाऊन बसला. इकडे दामिनीही मुकाट्यानें दार बंद करून त्याजकडे माघारी परतली.

---

## भाग दुसरा

दामिनीच्या पित्याचें नांव हरनाथ होतें. त्याचें राहण्याचें ठिकाण बसंतपूर. बसंतपूर कोणत्या जिल्ह्यांत आणि कोठें आहे हें कांहीं आह्मी सांगू चहात नाहीं आणि न सांगणें हेंच उचित आहे. परंतु एवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, हें गांव परम पुनीता गंगानदीच्या किनाऱ्यावर वसलेलें असून त्याची वसतीही चांगली लांब रुंद आहे. तेथें श्रीमंतांपासून गरीबांपर्यंत सर्व प्रकारचे लोक वास्तव्य करितात. त्यांत ब्राह्मणांची संख्या विशेष नसून कायस्थ आणि वैश्य या जातींची संख्या अधिक आहे.

हरनाथाची गृहस्थिति फारशी चांगली नव्हती. त्याची थोडीशी

शेतवाडी होती तींतून सरासरी तीन महिन्यांच्या बेगमीचें धान्यधुन्य येई. एखाद्या सालीं चांगली सराई झाली तर शेतीच्या उत्पन्नावर त्याचे पराकाष्ठा पांचसहा महिने गुजरत. हरनाथ जातीचा वैश्य होता. त्याला व्यापाराचें ज्ञान चांगलें होतें त्याचें एक गुळ, साखर आणि तंबाखू यांचें दुकान होतें. बहुधा तो आपल्या मालाची विक्री दुकानावर बसूनच करी तथापि तो कधीं कधीं फेरी करावयासही जात असे. तात्पर्य जेणें करून व्यापारांत आपणाला दोन पैसे मिळतील असे उपाय तो योजीत असे.

हरनाथाचें वय जवळ जवळ पन्नास वर्षांचें होतें. अर्थात् अलिकडच्या मानानें त्याचें आतां उतार वयच झालें होतें असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु यावरून कोणी असें समजूं नये कीं हरनाथ कधीं श्रमाच्या कामाला अंग चोरीत असेल; तसें तर मुळींच नाहीं. उलट अंगमेहनतीचे कामीं त्याचा पहिला पाय असे. आजच्या पन्नास साठ वर्षांपूर्वी हरनाथाच्या वयाचे लोक असे टणटणीत असत कीं आजकालच्या तीस पस्तीस वर्षांच्या तरुणांनीं देखील त्यांची हिंमत पाहून लाजावें. अलिकडे दिवसेंदिवस लोकांचे अंगची निर्बलता इतकी वाढत चालली आहे कीं जुन्याकाळच्या गोष्टी त्यांना अगदीं दंतकथा वाटूं लागल्या आहेत.

हरनाथाच्या शरीराचा वर्ण काळा व तेजस्वी असून अंगानें तो विशेष धष्टपुष्टही नव्हता किंवा केवळ सडपातळही नव्हता. त्याचें शरीर दुहेरी हाडाचें परंतु मध्यम चणीचें होतें. त्याचा चेहरा वाटोळा असून डोळे किंचित् खोल होते. त्याच्या डोक्यावरील केस अर्धवट पिकल्यामुळें गंगाजमनी दिसूं लागले होते. दातांची कवळी अजून जशीच्या तशी मजबूत होती. तो तिनें खुशाल ऊंस सोलून खाई आणि हरभरे फोडी. त्याचा परिवार एक मुलगा, सून आणि विधवा मुलगी इतक्या माणसांचा होता. आह्मी ज्यावेळची गोष्ट सांगत आहों त्याच्यापूर्वी पांच वर्षें हरनाथाची स्त्री देवलोकीं गेली होती. या कारणानें गृहस्थ होऊनही

हरनाथाला गृहसुखाचें वारें देखील लागत नव्हतें उलट त्याची गृहस्थिति त्याच्या अंगाला रात्रंदिवस खुपत होती.

हरनाथाच्या पुत्राचें नांव रामनाथ. तो यावेळीं चांगला वीसबावीस वर्षांचा होता. त्याचा रंग सावळा असून अंगकाठी सडपातळ होती. माता परलोकवासी होतांच रामनाथाला अशा खोट्या लोकांची संगत लागली कीं त्याचें चरित्र दिवसेंदिवस बिघडतच चाललें. बरें वाईट, अथवा खरें खोटें हें निवडण्याचें त्याला बिलकूल ज्ञान नव्हतें. कोणत्याही कृत्याचा पुढें परिणाम काय होईल याचा विचार न करितां तें तो करीत असे. तारुण्यावस्थेंत मनुष्य बिघडण्याला प्राय: दोन गोष्टी मुख्य कारण होत असतात एक तर वाईट लोकांची संगति आणि दुसरें खर्चावेचाची मुभना. रामनाथाला या दोन्हीही गोष्टी साह्य झाल्या होत्या. खोट्या लोकांची संगति तर त्याला पहिल्यापासून होतीच परंतु आई जिवंत असल्यामुळें त्याचे हातीं पैसा अडका लागत नसे. आतां घरांत आई नसल्यामुळें त्याला तीही सवलत मिळूं लागली. रामनाथ पहिल्यापासूनच घरगुती गोष्टींत फारसें मन घालीत नसे हरनाथ जेवढें कांहीं कमवून आणी तेवढें खर्च करून ही स्वारी चैनींत वागत असे. बिचारा म्हातारा सारा दिवसभर दुकानावर बसे अथवा गांवोगांव फिरावयास जाई आणि इकडे रामनाथ घरीं राहून मनास येईल तसें करीत असे. कोनाकोपरा आणि बोळवळद शोधून जो कांहीं रुपया पैसा हातीं लागेल तो सर्व बाहेरख्यालींत खर्च करी.... घरांत एक विधवा बहीण असे तिला तिचें घरकामच सारा दिवसभर पुरवें. मग ती आपले बंधूराज घरांत काय करतात हें कसें पाहणार ? त्यांतूनही एखादे वेळीं पैसा अडका नेतांना तिनें त्यास पाहिलें आणि कोठून घेतोस ह्मणून विचारिलें तर ते मी घरखर्चाकरितांच घेतले आहेत असें तो तिला सांगे. ती बिचारी त्याचें ह्मणणें खरें मानी. पण पुढें जेव्हां त्याचें वर्तन तिला दिसून आलें तेव्हां तर तिनें बोलणेंच सोडून दिलें. रामनाथानें घरांतून कांहीं जरी नेलें तरी शिवीगाळ आणि मारामारी होण्याच्या भीतीनें ती एक अक्षाक्षरही बोलत नसे.

हरनाथाला ही गोष्ट समजतांच त्यानें एक दोन वेळ रामनाथाची कानउघडणी करून पाहिली. तरी त्याला रामनाथाचें वर्तन सुधारण्याची कांहींएक आशा दिसेना पुढें तोही कानाडोळा करूं लागला. तो आपल्या मनांत ह्मणाला " याचे हातीं जर अजीबात पैसाअडका लागूं दिला नाहीं तर न जाणो हे राजेश्री कोठें तरी चोरी बिरी करून बसावयाचे. आणि सरकारचे बंदिवान व्हावयाचे. त्यांत तरी आपल्याच नांवाला कलंक. असो जें चाललें आहे तें ठीक आहे. " हरहर ! मातापितरांचें वात्सल्य तरी किती अलौकिक असतें पहा ! खरें आहे ' कुपुत्रो जायेत्क्वचिदपि कुमाता न भवति. '

हरनाथ आपला नगद ऐवज मात्र संभाळून असे. परंतु घरांत किरकोळ पैसाअडका राहिला कीं त्यावर रामनाथाचा हात पडलाच ह्मणून समजावें. हरनाथानें आपल्या पुत्राला ताब्यावर आणण्यासाठीं पुष्कळ उपाय केले परंतु ते सर्व व्यर्थ झाले. शेवटीं मागचापुढचा विचार पाहून त्यानें रामनाथाचें लग्न करून देण्याचें ठरविलें आणि आपल्या निढळच्या घामानें मिळविलेले दीडशें रुपये खर्च करून लग्नसमारंभ साजरा केला. विवाह झाल्यावर रामनाथ कांहींसा सुधारला. आणि आठवड्यांतून तीन चार दिवस घरींही राहूं लागला.

रामनाथ लहान असतां हरनाथानें त्याला लिहिणें वाचणें शिकण्याकरितां गांवांतीलच एका रेम्याडोक्या पंतोजींचे शाळेंत पाठविलें होतें. तब्बल तीन महिने परिश्रम करून गुरूजींनीं आपल्या शिष्याला कशीतरी अक्षरओळख करून दिली. पुढें बाराखड्या सुरूं होतांच रामनाथानें शाळेस न जातां लपून बसण्याची विद्या शिकून घेतली. पहिल्या वेळीं तर हरनाथ आणि गुरूजी त्याला शोधतां शोधतां दमले. त्यांनीं सारा गांव पालथा घातला. तथापि रामनाथाचा पत्ता लागला नाहीं. शेवटीं शेतेमळे शोधतां शोधतां ही स्वारी एका आंब्याच्या झाडावर बसलेली दृष्टीस पडली. विचारपूस करितां स्वारीनें तीन

दिवस पर्यंत आंबे खाण्यावरच गुदरले होते आणि रात्रीं कोणाच्या तरी पडसाळेंत पडून झोंप घेतली होती असें कळलें. यावेळीं रामनाथाचें वय चौदा वर्षांचें होतें.

रामनाथाची बुद्धि अत्यंत तीव्र होती. ज्या विषयांत तो आपलें लक्ष्य घाली त्यांत तें उत्तमकारें शिरे. परंतु त्यानें आपली इतकी चांगली बुद्धि दुष्कृत्यें करण्याच्या कामात खर्च केली. लिहिण्यावाचण्यांत त्याचें मुळीं देखील चित्त नसे. त्यामुळें गुरूजींलाही नित्य मारहाण करावी लागे. परंतु हळूहळू गुरूजींचा मारही त्याच्या इतका अंगवळणीं पडला कीं तो त्याच्या खिसगणतींतही नसे. त्याची उच्छृंखलवृत्ति दिवसेंदिवस वाढतच चालली. गुरूजींच्या अव्याहत परिश्रमानें रामनाथाला कसें बसें लिहिणें वाचणें येऊं लागलें. पुढेंपुढें तर त्यानें असा उपद्व्याप मांडिला कीं गुरूजीला गांवांत राहणें देखील कठीण झालें. शेवटीं निरूपायास्तव बिचारा गुरूजीही कांहीं दिवसाकरितां म्हणून बाहेरगांवीं निघून गेला. मग तर काय रामनाथाला दाही दिशा मोकळ्या झाल्या. शाळा सुटल्यावर पांच वर्षांनीं रामनाथाच्या मातेचा देहांत झाला. आणि त्यानंतर दोन वर्षांनीं हरनाथानें कुसुम नामक एका कुलीन आणि सुंदर कुमारीशीं त्याचें लग्न लावून दिलें.

यावेळीं कुसुमाला पूर्ण तारुण्यावस्था प्राप्त झाली होती. हा तारुण्याचा काल असा असतो कीं यामध्यें कुरूप स्त्रीच्या ठिकाणींही एक प्रकारची मोहकता भासूं लागते. आणि कुसुमचें तर प्रत्येक अंग विधात्यानें जणूं संभाळून संभाळून बनविलें होतें मग तिच्या सौंदर्याची मातबरी काय वर्णन करावी नखशिखांत तिचें संपूर्ण शरीर सुंदर आणि डौलदार होतें तिच्या नांवाप्रमाणें तिची अंगकांति चंपकपुष्पासारखी होती. मस्तकावरील केश घनदाट, तुळतुळीत आणि कोमल असून ते कंबरेपेक्षांही लांब सडक होते. तिची मुखचर्या तर केवळ अनुपम होती. कवींनीं वर्णन केल्याप्रमाणें तिचे नेत्र मृगमीनखंजनसमान जरी नव्हते तरी पण त्यामध्यें अशी कांहीं जादू भरली होती कीं त्यांवर एकदा एखाद्याची दृष्टि पड-

त्यावर ती तेथून माघारी फिरविणें त्याला कठीण जात असे. नेत्रांच्या शोभेंत चंचलता हा एक गुण मानला गेला आहे परंतु कुसुमच्या नेत्रांत चंचलतेचें तर नांवही नसून उलट ते शीलसंकोचानें इतके भरलेले असत कीं त्यांच्या भारानें ते सदा भूमिगतच झालेले असत. तिच्या कोंवळ्या कोंवळ्या ओठापासून मधूर हास्य तर कधीं दूरच होत नसे. तिच्या देहाचें सुकुमार प्रत्येक अंग यौवन भारानें नम्र होऊन अगदीं दबल्या सारखें झालें होतें. रूपयौवना सारख्या अमोल संपत्तीची जोड मिळाली असतांही त्या सुशील स्त्रीला अभिमान किंवा आढ्यता यांचा स्पर्शही झालेला नव्हता. आणि एका बाबतींत तिचें चित्त सदा अप्रसन्नच रहात असे. आपणाला प्राप्त झालेल्या या गरीब कुळांत आपल्या रूपसंपदेचें नीट रीतीनें कसें संरक्षण होईल या गोष्टीची चिंता तिच्या चित्तांत नेहेमीं वास करीत असे.

कुसुमचें प्रत्येक अंग जसें रूपमाधुर्यांत बुडून गेलेलें होतें; तसेंच तिचें हृदयही लज्जा, शील, संकोच आणि दया इत्यादि गुणांनीं भरलेलें होतें. अभिमान, हट्ट आणि द्वेष इत्यादि दुर्गुणांची तिला ओळख देखील नव्हती. तिची अत्यंत कोमल जिव्हा कडू आणि कठोर शब्दांचा उच्चार करण्यास भीत असे. जेवढें कष्ट ती स्वतः सहज सहन करण्यास समर्थ असे तेवढे देखील दुसऱ्याला झालेले तिला सहन होत नसत. तिच्या मनाचा असा दृढ सिद्धांत होऊन राहिला होता कीं या संसारांत जर कांहीं धर्म असेल, पुण्य असेल, अथवा स्त्रियाकरितां ह्मणून एखादें मुख्य कर्तव्य असेल, भूषण अथवा शोभा असेल तर ती केवळ एक पतिभक्ति मात्र आहे. पातिव्रत्यापुढें ती देवी, देवता, धर्म, कर्म यापैकीं कशालाही जास्त समजत नसे. या संसारांत सुखप्राप्तिकरितां अथवा परलोकांत परमपदप्राप्तीकरितां स्त्रियांना केवळ पातिव्रत्य हेंच एक साधन विधात्यानें नेमून दिलें आहे ही गोष्ट तिच्या मनांत पूर्णपणें बिंबली होती. पातिव्रत्यच स्त्रियांचें भूषण, पातिव्रत्य स्त्रियांचें अखंड धन आणि पातिव्रत्यच स्त्रियांचा परम धर्म होय ही गोष्ट परोपरींनीं तिच्या मनांत बिंबविली गेली होती. स्त्रियांना पातिव्रत्यापासूनच मान, मर्यादा आणि कीर्ति या गोष्टी

प्राप्त होत असतात. पति कसलाही कुधी, कुलक्षण, कर्कश, क्रोधी अत-एव कुपात्र असेना परंतु स्त्रीनें त्याचे ठिकाणीं अचलभक्ति ठेवणेंच तिचा मुख्य धर्म होय. पतीशीं विरोध करणारी स्त्री आपल्या उद्धारासाठीं कितीही जप, तप, दान, धर्म आदिकरून शुभकर्में करणारी जरी असली तरी एका पतिभक्तिवांचून तिचें सर्व कृत्य विफल आणि व्यर्थ होय. आपल्या मातेपासून कुसुमनें वरील गोष्टींचा इतका दृढ बोध करून घेतला होता कीं कोणत्याही अवस्थेंत ती आपल्या पातिव्रत्यापासून ढळण्यास केवळ असमर्थ होती. खरोखर अशा प्रकारचे सुंदर बोध या सृष्टींत फारच थोड्या लोकांच्या नशीबीं असतात असें ह्मटलें तरी चालेल.

ईश्वराची लीला मोठी विचित्र आहे. त्याच्या कृत्यांच्या कार्यकारणांचा अंत लागणें मानवशक्तीच्या बाहेरचें आहे. कुसुमचे ठिकाणीं जसें गुणरूप एकवटलें होतें त्याप्रमाणें दुर्दैवानें तिला पति मात्र मिळाला नव्हता. तिच्या पतीच्या अंगीं तिच्या उलट सर्व प्रकारचे दुर्गुण वास करीत होते. कुसुमसारख्या स्त्रीरत्नाची प्राप्ति झाली असूनही रामनाथ तिजवर प्रेम करीत नसे अथवा तिचा आदरही करीत नसे. सृष्टीचा असा कांहीं विलक्षण स्वभावच आहे कीं नेहेमीं चांगल्याची वाईटाशीं आणि वाईटाची चांगल्याशीं संगत घडलेली दिसून येते. ही स्थिति मनुष्यांतच आहे असें नाहीं तर संपूर्ण सृष्टपदार्थांमध्येंही ती दिसून येते.

लग्न झाल्या दिवसापासून दुर्दैवी कुसुमला संसारसुखाचें वारें देखील लागलें नाहीं. रामनाथाला ताळ्यावर आणण्यासाठीं तिनें अनेक प्रकारचे योग्य ते उपाय करून पाहिले. परंतु तिचें नशीब असें खडतर होतें कीं तिनें केलेले सर्व उपाय व्यर्थ झाले. पवित्र आणि अभिन्नप्रेमाच्या स्वादाविषयीं लुब्ध असलेल्या कुसुमचें हृदय कधीं देखील परितृप्त झालें नाहीं. रामनाथाचे हातून तिच्या मनाजोगें वर्तन एखादे दिवशीं स्वप्नात देखील घडलेलें तिनें पाहिलें नाहीं.

---

## भाग तिसरा.

एक छोटेखानी नाव नदीच्या प्रवाहाला कापीत कापीत मोठ्या झपाट्यानें चालली आहे. नावेप्रमाणें नदी देखील छोटेखानीच आहे. तिच्या जलाला फारसा वेगही नाहीं अथवा तिच्यांत लाटांचे हेलकावेही नाहींत. नदी कशाची एक लहानशी निर्झरिणी ह्मटलें तरी चालेल. नदींत चालत असलेल्या नावेवर एक सुंदरसें शीडही उभारलें आहे. एका बाजूस एक नावाडी सुकाणू धरून स्वस्थ बसला आहे आणि दुसरा मोठ्या प्रसन्न अंतःकरणानें त्या उभारलेल्या शिडाकडे पहात पहात गुडगुडीचे झुरके घेत आहे.

एक तर छोटीशी नाव, तिजवरही शीड, अनुकूल वारा आणि प्रवाहाकडची गति इतक्या गोष्टी अनुकूल असल्यावर मग त्या नावेचा वेग काय विचारावयाचा आहे. ती तर यावेळीं एखाद्या मोठ्या वेगवान आगबोटीचीही खुमखुम जिरवीत होती. नावेंत बसलेल्या लोकांना आपली नाव किती वेगानें चालली आहे याचें अनुमानही होत नव्हतें. तथापि किनाऱ्यावरील वृक्ष, भूमि आणि बागमळे मोठ्यावेगानें पळत आहेत असें पाहून त्यांना मोठें कौतुक वाटत होतें. कांहीं दूर जातां जातां वायूची गति फिरली. तेव्हां निरूपायास्तव नावाड्यांनीं शीड खालीं उतरून घेऊन वल्हीं मारण्यास सुरवात केली. त्या नावेंत एक तरुण मनुष्य बसला होता. तो नावाड्यास ह्मणाला " कांरे खदेरू, संध्याकाळ होण्याचे पूर्वींच आपण पोहचणार नाहीं काय ?

खदेरू—अजूनपर्यंत मोठ्या नदीचा संगम मिळाला नाहीं. दिवस असतां जर मोठी नदी आटोपेल तर प्रहर रात्रीच्या सुमारास आपण पोंहोचलों तर पोंहोचूं.

**तरुण**—तर मग आतां मोठी नदी केव्हां लागेल ?

**खदेरू**—आतां फार वेळ नको. फक्त एवढें वळण घेण्याचाच अवकाश.

प्रिय वाचकहो या नावेंत असलेल्या तरुणाला तुम्ही ओळखिलेंच असेल. हा आपला पूर्वपरिचित रामनाथ. हा आज पित्याची आज्ञा घेऊन आपल्या स्त्रीस आणण्याकरितां आपल्या सासुरवाडीस चालला आहे. रामनाथाची सासुरवाडी भवानी गंजांत होती. हा एक लहानसा गांव असून त्यांत दोन चार घरें वैश्यांचीं आणि बाकीचीं पुष्कळशी वस्ती मुसलमानांची आहे.

थोडक्याच वेळांत नाव मोठ्या नदींत येऊन पोहोचली. ही नदी पूर्व पश्चिम वहात होती. या नदीचें नांव पद्मा असें होतें. पद्मा नदी जशी खोल तसाच तिचा वेग आणि कटावही जबर होता. या ठिकाणीं नदीचें पात्र चार मैलांहून कमी नव्हतें. रामनाथाची नाव सरळ पलीकडचे तीरास जाणें शक्य नव्हतें. त्या नावेला पूर्वेकडचे बाजूस प्रवाहाबरोबर जाऊन नंतर वळण घ्यावयाचें असल्यामुळें तिला चांगला सहा मैलांचा पल्ला पडणार आहे.

फाल्गुनाचा महिना असल्यामुळें पावसापाण्याचें भय नाहीं. आकाश अगदीं आरशासारखें स्वच्छ झालें आहे. वाराही अनुकूल वहात आहे आणि नावाडी भरपूर जोरानें नाव वल्हवीत असल्यामुळें नाव अगदीं तीरासारखी चालली आहे. सूर्यास्त होण्यास किंचित् अवकाश होता इतक्यांत नाव पलीकडचें तीरास जाऊन पोहोचली. पलीकडचे तीरास पोहोंचल्यावर नावाडी लोक वल्हविणें बंद करून नाव वाहतीवर सोडल्यावर जरा सुस्तावल्यासारखे होऊन गुडगुडी ओढण्याच्या नादास लागले. एका नावाड्यानें गुडगुडी भरून प्रथम रामनाथास आणून दिली. रामनाथाचें धूम्रपान झाल्यावर नावाड्यांनींही दोन दोन, चार चार झुरके घेतले आणि मग ते पुन्हां नाव वल्हवूं लागले. तेव्हां रामनाथानें नावाड्यास विचारिलें " कसें काय आतां किती दूर आहे. "

**नावाडी**—पायीं जाणारा तर दिवस असतांना देखील पोहोचेल. परंतु नावेला मोठाच फेर घेऊन जावें लागणार आहे. त्यामुळें आज

कांहीं भवानीगंजास आपलें जाणें होत नाहीं. चांदणी रात्र असती तर आणखी एक प्रहरभर कसून मेहनत केली असती. पण रात्र पडली अंधारी. तशांत नदी पडली अवकळ. त्यामुळें आतां नाव पुढें काढण्याचें साहस आमच्यानें होत नाहीं. करितां आजची रात्र येथेंच तळ देऊन सकाळी पांढरे फुटण्यापूर्वींच येथून निघण्याचें करूं.

**राम०**—बरें तर. तसेंच करूं या. पण हें ठिकाण कांहीं चांगलेसें दिसत नाहीं येथें आसपास नावेचा उतार किंवा मनुष्यांची वस्ती वगैरे कांहींच दृष्टीस पडत नाहीं. यामुळें येथें उतरण्याविषयीं मन जरा आंत बाहेर करीत आहे.

**नावाडी**—बाबूसाहेब, येथें तुह्माआह्मांला कसली भीती. आपणाजवळ कांहीं मालमत्ता नाहीं किंवा आपले बरोबर बायकामुलेंही नाहींत.

**राम०**—अरे बाबा, लुटारू लोकांना कोठें आपल्या दारिद्र्याची कल्पना असते. ते दुष्ट द्रव्याच्या आशेनें अगोदर कंठस्नान घालितात. आणि मग जवळ कांहीं आहे नाहीं तें पाहतात.

**नावाडी**—बाबूसाहेब आपलें ह्मणणें खरें आहे. पण आपल्या या लहानशा नावेवर छापा घालण्याला ते काय अगदींच वेडे आहेत. आपण अगदीं बेफिकिर असा. आपणाकडे कोणी ढुंकून देखील पाहणार नाहीं.

**राम०**—अरे बाबा, पण लुटारू लहान मोठे कांहीं पहात नाहींत आणि एका पैशाकरितां देखील एखाद्याच्या जिवावर उदार होण्यास कमी करीत नाहींत.

**नावाडी०**—सगळें खरें पण करायाचें कसें या अशा अंधेऱ्या रात्रीं नावें कोठें जें काय नशीबीं असेल तें होईल.

**राम०**—बरें तर उतरा पण रात्रीचे वेळीं जरा सावधपणानें जागते रहा.

नावाड्यांनीं तीरावरील जमीनींत खुंटा पुरून त्याला नाव बांधून उभी केली. मग ते रामनाथाला ह्मणाले " तुमच्या पाशीं कांहीं डाळ तांदूळ असल्यास स्वैंपाकाची तयारी करा. " रामनाथाचे जवळ फराळाचें होतेंच

तथापि स्वैंपाकपाण्याच्या गडबडींत बरीचशी रात्र मौजेनें लोटेल असा विचार करून त्यानें नावाड्यांच्या ह्मणण्यास रुकार दिला. इकडे रामनाथानें आपला चौका लाविला तो तिकडे नावाड्यांनींही दगडावर तपेली चढविली. कांहीं वेळानें सगळ्यांचीं जेवणें आटोपलीं. मग ते भांड्याकुंड्यांची आवरासावर करून पुन्हा नावेवर येऊन बसले आणि त्या सर्वांनीं एक दोन वेळ गुडगुडीचे झुरके घेतले. नावाडी सार्‍या दिवसभराचे थकलेले असल्यामुळें त्यांना तर पडतां पडतां झोंप लागली.

ती कृष्णपक्षांतील दशमीची रात्र होती. अद्यापपर्यंत चंद्राचा उदय झाला नव्हता आणि त्यामुळें चहूंकडे घनघोर अंधाराचेंच साम्राज्य झालें होतें. अशा वेळीं कोणी डोळ्यांत बोट घातलें तरी देखील तें दिसण्याची पंचाईत होती. तेथून थोड्याच अंतरावर मसणवाट होती. तेथें मांसाच्या आशेनें आलेलीं कोल्हीं वाळकें जळकें मांस खाऊन जयध्वनी करीत होती. त्यावांचून दुसरा कोणताही ध्वनी कानीं तेथें पडण्याचा संभव नव्हता. परंतु त्या सर्व एकांततेचा भंग करणारा असा नावेच्या बुडाशीं थबथब शब्द कां बरें होऊं लागला ? रामनाथाचें तिकडे लक्ष्य गेलें होतें खरें तथापि शीतल आणि मंद अशा वार्‍यानें नदींतील लहान लहान लाटांशीं खेळतां खेळतां रामनाथाच्या नेत्रांवर येऊन त्याला झोंप घ्यावयास लाविलें. इकडे वायुवेगानें नाव हलत असल्यामुळें झोके मिळून रामनाथाला चांगलीच गाढ झोंप लागली.

रामनाथ गाढ झोंपेंत मग्न असतां एकाएकीं नावेच्या बुडाशीं धप्प असा आवाज झाला. त्या आवाजा सरसा तो चपापून जागा झाला. आणि नावाड्यांना जागें करून तो ह्मणाला " पहारे येथें कांहीं वाजल्यासारखें वाटतें. " नावाडीही झटपट उठून डोळे चोळीत चोळीत ह्मणाले " काय ह्मणतां बाबूसाहेब ? काय आहे ? "

राम०—नावेच्या बुडाशीं कसलासा आवाज झाला आणि नावही हलली.

तें ऐकून दोघे नावाडी नावेवरून उतरून किनाऱ्यावर गेले आणि त्यांनीं चांगलें दूरवर न्याहाळून पाहिलें परंतु त्या अंधेऱ्या रात्रींत त्यांना तेथें कांहींच दिसलें नाहीं. मग ते तसेच नावेवर परत आले. इतक्यांत नदीच्या दरडीवर एक मातीचा ढपला पाण्यांत पडला. तो पाहून प्रथमतः ते सगळेच घाबरले. परंतु नीट रीतीनें पाहिल्यावर त्यांचा संशय दूर होऊन ते रामनाथास ह्मणाले " आपण झोंपेंत असल्यामुळें आपणाला उगीच भीति वाटली. नावांच्या बुडाशीं तर कांहींच दिसत नाहीं. असाच एखादा मातीचा डिखळा पडून आवाज झाला असेल " रामनाथ ह्मणाला " तसेंही होण्याचा संभव आहे. "

अशा रीतीनें चित्ताचें समाधान करून ते सर्व पुन्हा झोंपीं गेले. परंतु रामनाथ आपल्या बिछान्यावर पडला होता इतकेंच ! बाकी त्याला चांगलीशी झोंप आली नाहीं. एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळत त्यानें सुमारें एक तास काढला असेल इतक्यांत त्याला थोडीशी डुकली लागली पण उपयोग काय झाला. त्याच्या डोळ्यांचीं पातीं मिटतात न मिटतात तोंच धाड धाड शब्द होऊन नाव जोरानें डगमगूं लागली, त्यासरसे नावाडीही भीतीनें ओरडतच उठले. रामनाथ अर्धवट जागा होताच. त्यानें डोळे उघडून पाहिले तों चार पांच धटिंगण हातांत मोठे सोटे घेऊन तोंडावरून बुरखा घेतलेले नावेवर चढले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. आणि तिकडे नदी किनाऱ्यावर एक लहानशी मशाल जळत असलेलीही त्यानें पाहिली.

रामनाथाचें हृदय भयभीत झालें. सारें शरीर कांपूं लागलें. मस्तक फिरूं लागलें आणि काळीज धडधडूं लागलें. कांहीं वेळपर्यंत काय करावें तें त्यास बिलकुल सुचेना. इतक्यांत त्याच्या सुदैवानें त्याच्या कानांत कोणीसें सांगितलें कीं, " अरे वेड्या, हें काय करतो आहेस तूं ? जा येथून, लवकर पळ काढ, नाहींतर हे डाकू ( दरवडेखोर ) आतां तुझा प्राण घेताहेत. त्यासरशीं रामनाथानें नदींत उडी टाकिली.

त्याचे मागून नांवाड्यांनींही उड्या घेतल्या. मग रिकामी नाव झाल्यावर दरवडेखोरांनीं तींत हवें तितकें धुंडाळलें परंतु, त्यांना तेथें दोन चार अंगावर घालण्याचे कपडे आणि पांचचार स्वैपाकाचीं भांडीं यांशिवाय एक कपर्दिकही मिळाली नाहीं. तेव्हां दैवयोगानें जें काय हातीं लागलें तें घेऊन दरवडेखोरांनीं तेथून पोबारा केला.

इकडे रामनाथ नदीच्या प्रवाहांत पोहत पोहत खालीं सुमारें चार मैल जाऊन नंतर किनाऱ्यास लागला. त्या समयीं चंद्रोदय झाला होता व त्यामुळें चहूंकडे बराच प्रकाश पडला होता. रामनाथानें वर चढून पाहिलें तों जवळ समोरच भवानी गंज आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तो पूर्वी एकदोन वेळ त्या गांवीं आला असल्यामुळें त्याला तेथील वाटांची बरीच चांगली माहिती होती. मग तो आपल्या अंगांत असलेलें सर्व सामर्थ्य खर्च करून अंगावरील ओल्या वस्त्रांसह धांवत धांवत गांवाकडे जावयास निघाला आणि आपल्या श्वशुरगृहीं जाऊन पोंचतांच मोठ्यानें ओरडून धाडकन अंगणामध्यें पडला. भय, थंडी आणि पळण्याचे श्रम यामुळें त्याला इतका थकवा आला होता कीं जमीनीवर पडतांच त्याला मूर्च्छा आली. तेव्हां त्याच्या पडण्याची चाहूल लागून त्याची सासू हातांत दिवा घेऊन बाहेर आली आणि पहाते तों आपला जांवई रामनाथ नागवा उघडा आणि ओलेता होऊन बेशुद्ध पडला आहे असें तिचें दृष्टीस पडलें. तिनें लागलींच कुसुमला हाक मारून बाहेर बोलाविलें आणि तिजकडून रामनाथास कोरडें धोतर नेसविलें त्याचे भोंवतीं शेगड्या पेटवून शेक केला. तेव्हां रामनाथ कांहींसा शुद्धीवर आला. मग त्या दोघींनीं त्यास आंत उचलून नेलें. रामनाथ चांगलासा शुद्धीवर आल्यावर त्यानें आपणावर गुजरलेल्या संकटाची इत्थंभूत सर्व हकीकत त्यांना सांगितली. ती ऐकतांच त्या दोघी मायलेकींच्या उरांत धस्स झालें. रामनाथावर हल्ला करणारे लोक कोण असावेत हें त्या दोघी मायलेकी पुरतेपणें जाणून होत्या. त्यामुळें त्यांना आणखी एक नवीनच चिंता वाटू

लागली. तथापि त्या गोष्टीची रामनाथास कांहींएक ओळख न देतां त्याच्या खाण्यापिण्याची चौकशी केली परंतु रामनाथानें त्या वेळीं खाण्याची निरीच्छा दर्शविली. तेव्हां त्यांनीं त्याचे करितां एक मऊसा बिछाना तयार करून दिल्यावर त्याजवर जाऊन तो पडला. त्यावेळीं कुसुमला एकीकडे घेऊन तिची आई तिला ह्मणाली " आज परमेश्वरानें मोठीच कृपा केली ह्मणावयाची. कोणाचें पुण्य साह्य झालें न जाणे. नाहीं-तर आज मोठाच अनर्थ होत होता. काय करूं या मूर्खांना समजवितां समज-वितां माझे तर अगदीं हात टेकले. ते रामोशी माझें काडीइतकें ऐकतील तर शपथ. या गांवच्या गांवगुंड मंडळींच्या संगतीला लागून हे दोघेही असे बिघडले आहेत कीं यांच्यामुळें केव्हां काय प्रसंग गुदरेल तें कांहीं सांगता येत नाहीं. पण तूं संभाळ हो. रामनाथाला या गोष्टीची यत्किं-चित् देखील ओळख देतां कामा नये. आतां तुला देखील मी येथें ठेवीत नाहीं. रामनाथाबरोबर तुझी रवानगी करून देऊन मागून मीही निघून येईन. मग मागें या शुंभांच्या नशिबीं असेल तसें होईल. "

कुसुमनें आईचें सर्व भाषण ऐकून घेतलें परंतु तिजला कोणत्याही प्रकारें उलट उत्तर नाहीं. उघडच आहे मातेनें सांगूं नको ह्मटलें खरें पण कुसुमच्यानें तसें कसें राहवणार त्यावेळीं तिची चित्तवृत्ति अगदीं द्विधा होऊन गेली होती. असो.

ज्यावेळीं वरील गोष्ट घडली त्याच्या पूर्वीं तेरा वर्षें रामनाथाचा सासरा मरण पावला होता. त्याला तीन मुलगे आणि एक मुलगी अशी चार अपत्यें होतीं. सगळ्यांत मोठ्या मुलाचें नांव त्रिलोकीचंद. यावेळीं याचें वय सत्तावीस अठ्ठावीस वर्षांचें होतें. मधल्याचे नांव तारा-चंद. वय सुमारें चोवीस पंचवीस वर्षांचें. त्याच्या तिसऱ्या मुलाचें नांव विशेषसें प्रसिद्ध नव्हतें. चवथें अपत्य कुसुम, ही यावेळीं एकवीस वर्षांची होती. त्या गांवात पाठशाळा नसल्यामुळें त्रिलोकी आणि ताराचंद याना कोणत्याही प्रकारचें शिक्षण मिळालें नव्हतें. ते दोघे

नुसते अशिक्षितच जरी असते तरी चिंता नव्हती. परंतु त्यांचें पाऊल फारच वाईट मार्गांत पडलें होतें. गांवांतील लबाड लोकांच्या संगतीला लागून ते पक्के लुटारू बनले होते. त्या कामांत मात्र त्यांचा हात खंडा झालेला होता. ते नित्य नव्या ठिकाणीं जाऊन आपली दरवडयाची शिकार साधीत.

कुसुमच्या आईनें प्रथमतः आपल्या मुलांना पुष्कळ सांगून सवरून पाहिलें. धाक दपटशा घातला. तथापि त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. उपदेश करण्याच्या कामीं आपला अगदीं निरूपाय झाला. कांहीं केल्या आपले मुलगे आपलें ऐकत नाहींत; असें पाहून बिचारी कपाळावर हात मारून स्वस्थ बसली. ती साध्वी जशी सुशील, शांत आणि सुस्वभाव होती; त्याच्या अगदीं उलट असे तिचे मुलगे उचले, लुटारू आणि दरोडेखोर निपजले. सुदैवानें कन्या कुसुमकुमारीवर मातेच्या सद्गुणांची पूर्ण छाया पडली होती. खरोखरच सुशील कुमारी कुसुमनें आपल्या आईच्या निरूपम सद्गुणांचें पूर्ण ग्रहण केलें होतें.

प्रिय वाचकहो ! तुह्मीं ताडलेंच असेल कीं रामनाथाच्या नावेवर हल्ला करणारे दरोडेखोर ह्मणजे प्रत्यक्ष त्याचे शालकराज होत. व त्यापैकींच एकानें त्यावेळीं त्यास तेथून पळवून जीवदान दिलें होतें. असो.

मातेनें हें घरचें व्यंग आपल्या नवऱ्यास कळवूं नको ह्मणून कुसुमला पुष्कळ सांगितलें होतें खरें. परंतु, कुसुमच्यानें ती गोष्ट आपल्या प्रिय पतिसमोर झांकून ठेववली नाहीं. तिनें हळूच आपल्या पतीकडे जाऊन त्याजपाशीं आपल्या बंधूंच्या दुर्वर्तनाची समग्र काहाणी सांगितली आणि ह्मटलें " रात्रीं अंधेरांत त्यांनीं तुह्मांला ओळखिलें नसेल आणि त्यामुळेंच असें झालें असेल. असो. जें झालें तें झालें. त्या गोष्टींचा आपण यत्किंचित् ही खेद मानूं नये. आणि ही गोष्ट दुसऱ्या कोणासमोरही उघड करूं नये. कारण, तसें करणें ह्मणजे आपण आपल्या हातानेंच आपली मांडी उघडी करून दाखविण्यासारखें आहे. "

कुसुमच्या मुखानें ती सर्व हकीकत ऐकितांच रामनाथाचा जीव अगदीं उडून गेला. परंतु त्यानें आपल्या मनांतील भाव आपल्या मनांत ठेवून तीस ह्मटलें " छे, छे, मी ही गोष्ट लोकांपाशीं बोलेन असें कधींही घडावयाचें नाहीं. तुझ्या सूचनेप्रमाणें मनांतल्या मनांतच ठेवीन. "

याप्रमाणें त्या दोघांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत ते तिघेही बंधु आपल्या साथीदारांसह आपल्या दिग्विजयाची दिवटी पाजळीत तेथें येऊन पोहोचले. तेवेळीं रामनाथाच्या खोलीत दिवा तेवत असलेला त्यांचे दृष्टीस पडला. तेव्हां आज खोलींत दिवा कसला जळतो आहे ह्मणून त्यांनीं आपल्या आईस प्रश्न केला. आपले दिग्विजयी पुत्र घरीं आलेले पहातांच ती साध्वी रागानें अगदीं लाल झाली आणि त्यांची चांगलीच खरड काढण्याच्या उद्देशानें त्यास ह्मणाली "तुह्मा लोकांच्या ह्या प्राण घेणाऱ्या गोष्टी कांहीं चांगल्या नाहींत. कधींना कधीं तरी तुमच्या दुष्कृत्यांचें भंड फुटेल. आज नाहीं आजच्या दहाव्या दिवशीं पंधराव्या दिवशीं तरी या गोष्टी बाहेर आल्यावांचून राहावयाच्या नाहींत. याकरितां मी तुमच्यापुढें हात जोडिते पाहिजे तर पदर देखील पसरिते. तुह्मी हे खेळ सोडून द्या. कां उगीच माझ्या ह्मातारपणाची खरात्री करता. खोट्याच्या कपाळीं कुऱ्हाडीचा घाव ह्मणतात तशी तुमच्या कर्मांची फळें तुह्माला फार वाईट तऱ्हेनें भोगावीं लागतील. शरीरानें चांगले धट्टे खट्टे आहात कोठे नोकरी चाकरी नसली मिळत तर मोलमजूरी करा पण हे असले ढंग सोडा. अजूनही कांहीं बिघडलें नाहीं. माझें सांगणें ऐका; नाहींतर खात्रीनें एखाद्या दिवशीं तुह्मी आपल्या प्राणाला आंचवाल आणि त्यामुळें माझ्याही जीवाशी गांठ घालाल ! त्या पोरीचें कुंकु बळकट ह्मणूनच तो काल तुमच्या हातून वांचला नाहींतर तुह्मी आपल्या कृतीनें तिच्या जन्माची माती करण्यांत कांहीं बाकी ठेवली नव्हती. "

आईचे तोंडचे ते शेवटचे शब्द ऐकतांच ते तिघेही असुर तिजवर ओरडून बोलले " आई, पहा हरघडी तूं कांहीं आह्मांला असलें बोलत

जाऊं नकोस. आह्मी तुला साफ सांगून ठेवितों. तूं आपली खुशाल खा, पी आणि स्वस्थ रहा. आमच्या बाबतींत जर तूं पुन्हां कांहीं चकार शब्द बोलशील तर तुझी तूं संभाळ. ”

याप्रमाणें आईचे अंगावर खेकसल्यावर त्यांच्या मनांत कांहीं संशय येऊन ते पुन्हां तीस ह्मणाले आई आह्मीच त्याच्या नावेवर छापा घातला ही गोष्ट जर त्याच्या ध्यानीं आली असली तर मग आतां त्याला जिवंत ठेवता उपयोगीं नाहीं तो खपविलाच पाहिजे. पहा तूं जर यांत कांहीं हरकत करशील तर तुझी देखील तीच गति होईल. असें बोलून त्या पिशाचरूपी पुत्रांनीं तिला धाक घातला. त्यांचे तें वज्रासारखें कठोर भाषण ऐकतांच ह्मातारीच्या पोटांत एकसारखें धडधड करूं लागलें. तेव्हां ती त्यांना पुन्हां एकवार विनवणीच्या शब्दांनीं ह्मणाली “ बिचाऱ्या रामनाथाला या गोष्टीची खबर देखील नाहीं. त्यानें तुह्माला मुळीं देखील ओळखिलें नाहीं. याकरितां विनाकारण त्याच्या जिवावर असे उदार होऊं नका. तुमची कुसुमासारखी बहीण कुसुम इजकडे पहा. आणि त्या चांदणी सारख्या माझ्या बाळेचा जन्म निरर्थक करूं नका. हाय हाय ! तुह्मी कितीतरी निष्ठुर आहांत. तुह्मांला आपल्या बहिणीची देखील दया माया येत नाहीं काय ! तुह्मांला जर असें करावयाचें असेल तर पहिल्यांदा मला मारून टाका. ”

वरीलप्रमाणें भाषण करून ती वृद्ध स्त्री मोठ्यानें आक्रोश करून रडण्याच्या अगदीं बेतांत होती तोंच त्या दुष्टांनीं तिच्या तोंडांत कापडाचा बोळा कोंबून तिला एका खांबाशीं जखडून बांधून टाकिलें. मग एकानें जाऊन कुसुमला हाक मारिली. कुसुमनें विचारिलें “ भय्या, काय काम आहे ” तो दुष्ट ह्मणाला “ जरा लौकर बाहेर ये पाहूं. ” कुसुमला वाटलें कांहीं काम असेल परंतु आपले सख्खे भाऊ आपला प्राण घेण्यास तयार असतील ही गोष्ट कांहीं तिच्या मनांत देखील आली नाहीं. ती बिचारी चटकन् बाहेर आली तेव्हां त्या दुष्टांनीं तिला घराबाहेर बऱ्याच

दूरांतरावर नेऊन आपला दुष्ट हेतु कळविला. त्यासरशी कुसुमच्या मस्तकावर जणू वीज पडल्यासारखे होऊन तिच्या डोळ्यापुढें अंधेरी आली आणि कांहींवेळपर्यंत तर ती बेशुद्धच होऊन पडली. मग कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन ती गळा दाटून आल्यामुळें कांपत कांपत त्यांना ह्मणाली " भैया, तुह्मी असे बोलूं देखील नका तुमचें कालचें कृत्य कोणाच्याही समजण्यांत आलें नाहीं. त्यांत त्यांना तर या गोष्टीची वार्ताही नाहीं. ते हें कृत्य दुसऱ्याच लोकांचें ह्मणून समजत आहेत. आणि मला तर अजूनपर्यंत तुमच्या बोलण्याचा देखील इतबार वाटत नाहीं. छी, छी, जग काय ह्मणेल " असें ह्मणत ती आपल्या पदरानें आपले डोळे पुसूं लागली. परंतु त्या पाषाणहृदयांना तिची यत्किंचित् देखील दया आली नाहीं. ते कुऱ्हाडीसारख्या कठोर शब्दांनीं तिला ह्मणाले " कां गे आह्मी सांगितलेलें तूं नाहींना ऐकत ? आह्मी जो विचार एकदां ठरविला तो ठरविला. त्यांत पुन्हां आतां बदल ह्मणून व्हावयाचा नाहीं. तुला जसें आह्मी सांगत आहोंत तसें केलेंच पाहिजे-त्याशिवाय गत्यंतर नाहीं. याप्रमाणें त्यांचें बोलणें चाललें असतां कुसुम एकसारखी थरथर कांपत होती, तरी देखील त्यांचें बोलणें सुरूच होतें. तेव्हां एकदम त्यांच्या पायावर डोकें ठेवून ती ह्मणाली " असें आहे तर तुह्मी प्रथमतः माझें डोकें उडवा आणि मग तुमच्या मनास वाटेल तसें करा. तुह्मी जर आपला हेका सोडील नाहीं तर मला तरी जगून काय करावयाचें आहे. " इतकें बोलून तीही मोठ्यानें गळा काढून रडूं लागणार तोंच त्या दुष्टांनीं तिचें तोंड दाबून ह्मटलें " गप्प, रडूं नको. असा गोंधळ करशील तर जी गति आईची झाली आहे तीच तुझीही होईल."

कोणत्याही रीतीनें विनविले तरी आपलें भाऊ कांहीं आपलें ऐकत नाहींत असें पाहून कुसुम एकदम अनुकूल स्वरानें त्यास ह्मणाली "ठीक आहे तुह्मी ह्मणतां तेंच खरें तुमच्या ह्मणण्याप्रमाणें झालेंच पाहिजे " वाचकहो त्यावेळीं न जाणे तिच्या अंगीं कोठलें बळ संचरलें आणि

कोठली विलक्षण बुद्धि सुचली ती! त्यावेळीं तिच्या तोंडावर अशी कांहीं एक चमत्कारिक प्रभा दिसत होती कीं ते पाषाणहृदयी लोकही कांहींसे भयभीत होऊन तिच्याकडे टकमका पाहूं लागले. त्यावर कुसुम पुन्हां ह्मणाली " तुमचा झालेला निश्चय तसाच ठाम असूंद्या मी जरा त्यांचेकडे जाऊन त्यांच्याशीं दोन शेवटचे शब्द बोलून येते आणि मग तुह्मी आपला योजिलेला हेतु निर्भयपणें सिद्धीस न्या. " त्या दुष्टांना ती गोष्ट पटली आणि त्यांनीं तिला तिच्या पतीच्याकडे जाण्याची परवानगी दिली.

मग कुसुम धांवतच घरांत निघून आली. बिचारा रामनाथ बिछान्यावर स्वस्थ झोंप घेत पडला होता. त्याला या बाहेरील गोष्टींची वार्ताही नव्हती. घरांत येतांच कुसुमनें मोठ्या प्रेमानें त्याला हलवून जागें केलें. " कां ? माझी कां झोपमोड केली ? " कुसुम ह्मणाली " असे उतावळे होऊं नका. हळु हळु सर्व कांहीं सांगते. "

रामनाथ ह्मणाला " अशी कोणती गोष्ट आहे कीं जी ऐकण्याविषयीं मी घाबरा होईन ? तूं सावकास सांग आणि मी ऐकतों. "

त्यावर थोडक्यांत सर्व हकीकत सांगून कुसुम ह्मणाली ही घाबरण्याची वेळ नव्हे. मुकाट्यानें मी सांगते तसें करा. हीं घ्या माझ्या पायांतली पैंजणें पेहेरा आणि मी तुह्मांला स्त्रीवेष देते आणि हा पाण्याचा लोटा हातीं घेऊन हळूच दार उघडा आणि पाठीमागचे दारीं चालते व्हा. मी येथून तुह्मांला वाट दाखविते. ती पहा एक लहानशी झोंपडी दिसत आहे. ती पायखान्याची जागा आहे तिच्या पाठीमागें असलेला झोपा दूर करून तेथून बाहेर पडा तेथें तुह्मांला एक मैदान लागेल चला आता उशीर करूं नका—पण जातांना आणखी एक गोष्ट करून जा. एखादा कापडाचा बोळा घेऊन तो माझ्या तोंडांत कोंबा आणि माझे हात पाय बांधून टाकून येथून चालते व्हा. कोणी टोकल्यास नुसतें हुं, हां, करा ह्मणजे झालें. "

रामनाथ—पण तुझी काय दशा होईल.

**कुसुम**—त्या गोष्टीचा विचार मी पाहिला आहे तुह्मी मात्र जलदी करा.

कुसुमच्या हिकमतीप्रमाणें रामनाथानें झटपट सर्व गोष्टी केल्यावर तो तेथून चालता झाला. त्याच्या मारेकऱ्यांना त्याच्या जाण्याची चाहूल लागलीच. तेव्हां त्यापैकीं एकजण ह्मणाला " कोण आहे कुसुम ? " रामनाथानें उत्तर केलें " हूं ! ! "

याप्रमाणें त्यांना झोका देऊन रामनाथ तेथून निसटला. तो त्याला माहित असलेल्या पोलिस चौकीवर जाऊन पोहोंचला. तेथें गेल्यावर पोलिसच्या जमादाराला त्यानें ती साद्यंत हकीकत कळविली. चौकीवाले ह्मणाले " ठीक आहे, रात्रीची रात्र तूं येथें नीज. मग सकाळचे सकाळीं पहातां येईल. "

त्यांच्या भाषणावर विश्वास ठेवून बिचारा रामनाथ निश्चिंत होत्सा-ता त्या चौकीवर निजला. आणि इकडे चौकीवालेही आपआपल्या ठिकाणीं स्वस्थ घोरत पडले.

---

## भाग चवथा.

इकडे कुसुमला परत येण्यास उशीर लागलेला पाहून ते दुष्ट घाब-रले. आणि घरांत जाऊन पहातात तों कुसुमचे हातपाय बांधले असून तिच्या तोंडांतही बोळा दिला असल्यामुळें ती अगदीं विवश होऊन पडली आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तो सर्व प्रकार पाहून त्यांच्या अंगाची नखशिखांत आग झाली. त्यांनीं कुसुमचे हातपाय सोडून आणि तोंडांतील बोळा काढून तिला सर्व वृत्तांत विचारिला. ती ह्मणाली " त्यांना तुमचा हेतु कसा ठाऊक झाला कोण जाणे. मी जों घरांत पाऊल ठेविते तोंच त्यांनीं झटपट करून माझ्या तोंडांत बोळा

कोंबिला आणि माझे हातपाय बांधून मला अगदीं जखडून ठेविलें. माझ्या तोंडांत बोळा असल्यामुळें माझ्यानें ओरडवलें देखील नाहीं. मग माझ्या अंगावरील दागीनें काढून घेऊन ते येथून पळून गेले. "

कुसुमच्या मुखानें वरील हकीकत ऐकतांच तिचे बंधु अधीकच संतप्त झाले. ते ह्मणाले "काय करावें मोठ्या बेढब रीतीनें शिकार हातची निसटली. तरी कांहीं चिंता नाहीं. चला त्याचा शोध करूं. आमच्या तावडींतून तो कुठवर वांचेल ! "

लागलीच एकानें मागीलदारीं जाऊन टेहेळणी केली आणि लागलींच परत येऊन ह्मटलें " तो खास पिछाडीच्याच रस्त्यानें पळाला असावा. आणि तेथून तो हजार हिश्शांनीं चौकीच्या आधारावर गेला असेल. कसेंही असो चला तिकडेच जाऊं. कांकीं पूर्वींही एका दोघांनीं असेंच केलें होतें. " असें ह्मणत ह्मणत ते सर्वजण चौकीकडे वळले. चौकीदार लोक यांना पूर्वींच मथलेले असत. यांना नेहमीं जी काय शिकार सापडे तींतून चौथा हिस्सा चौकीदार लोकांना घरबसल्या मिळत असे. झालें. मग काय पाहिजे. बहुधा हे लोक शिकारीस निघाले ह्मणजे चौकीवर वर्दी देत आणि चौकीदारांपैकीं एखादा शिपाईही आपणांमध्यें सामील करून घेत. इतकेंही करून एखादा दुर्दैवी प्राणी या रामोशांच्या हातून सुटून चौकीवर गेल्यास तो बिचारा पुन्हां अचुकपणें यांच्याच स्वाधीन केला जाई. आणि हातची सुटून गेलेली शिकार पुन्हां परत मिळवून दिल्याबद्दल चौकीदार लोक नेहमींच्या चौथाई हिश्शाखेरीज या दरोडेखोराजवळून इनाम उपटीत !

वर वर्णन केल्याप्रमाणें चौकीदारांचें भरपूर पाठबळ असल्यामुळें या दरोडेखोरांना मनसोक्त वर्तन करण्यास चांगलेंच फावत असे. त्यांच्या अत्याचारानें त्या गांवचे लोक अगदीं गांजून गेले होते. गांवकरी लोकांच्या जीवितवित्ताचे संरक्षक ह्मणविणारे पोलिसच जेथें उलट जीवितवित्ताचे भक्षक बनले होते तेथील लोकांच्या दुर्दशेचें कोठवर वर्णन

करावें ! असो. आपले दरोडेखोर लोक तडक चौकीवर येऊन त्यांनीं जणूं काय हक्कानेंच जमादारास हाक मारून जागें केलें. आणि आपल्या शिकारीची चौकशी केली. तेव्हां त्यांचे जमादाराशीं पुढीलप्रमाणें भाषण झालें.

जमादार—आह्मी जर त्याला पकडून दिलें तर आह्माला काय द्याल ?

दरोडेखोर—तर मग तो खास येथेंच आहे.

जमादार—पण तुह्मी त्याबद्दल देणार काय तें तर अगोदर सांगा.

दरोडेखोर—देण्याघेण्याचें पहातां येईल. आतां उशीर करूं नका. रात्र थोडी राहिली आहे. आणि दिवस उगविण्याचे आंत आह्मांला काम उरकावयाचें आहे.

जमादार—आणि रात्र थोडी राहिली ह्मणून काय झालें.

दरोडे०—व्हावयाचें काय पण जरा दिवस उगविण्यापूर्वी काम उरकलें असलें ह्मणजे निर्भय असतें.

जमादार—( हंसून )—अरे रात्र असो कीं दिवस असो आह्मी असें बळकट जाळें पसरून बसलों आहोंत कीं त्यांतून कसलीही शिकार निसटून जाणें मुष्किलीचें आहे.

दरोडे०—तें सर्व ठीक आहे पण जरा जलदी कराल तर बरें. कां कीं आह्माला येथून कोस दीड कोस नदी किनाऱ्यावर गेलें पाहिजे. ह्मणून ह्मणतो कीं आतां उशीर लावूं नका.

जमादार—तेथें त्यास नेऊन काय करणार ?

दरोडे०—करायचें काय सरळ यमाचे घरचा रस्ता दाखविणार !

इतकें बोलणें झाल्यावर जमादारानें मुकाट्यानें बिचाऱ्या रामनाथास त्या काळपुरुषांच्या हवालीं केलें आणि आपण दूर चालता झाला.

चौकीवर आल्यावर बिचारा रामनाथ निर्धास्तपणें झोप घेत पडला होता. पुढील संकटाची त्यास यत्किंचित् देखील आगा नव्हती. झोंपीं

जाण्यापूर्वी तो आपल्या मनाशीं ह्मणाला होता कीं " त्या दुष्टांच्या हातून तर आपण सुटलों. आतां रात्र उजाडल्यावर आपणच त्यांना त्यांच्या कर्माचें फळ चाखवूं. त्यांत वाईट एवढेंच आहे कीं प्रत्यक्ष आपले मेव्हणेच या कृत्यांत असल्यामुळें आपल्याच हातानें आपली मांडी उघडी करून दाखविल्यासारखें होणार आहे. परंतु त्यास उपाय नाहीं. ज्याअर्थी त्यांनीं आपल्या प्राणावरच आणून बेतली होती त्याअर्थी त्याबद्दल त्यांचा सूड घेणेंच उचित आहे. "

परंतु हे त्याचे झोंपीं जाण्यापूर्वींचे विचार केवळ कल्पनामात्र होतील हें कोठें त्याला ठाऊक होतें. बिचारा दोन वेळ पळतां पळतां अगदीं थकून गेला असल्यामुळें पोलिसांच्या विश्वासावर अगदीं घोरत पडला होता आणि आजच आपला शेवट होण्याची वेळ येणार आहे या गोष्टीची त्यास कल्पनाही नव्हती.

त्या पापी निर्दयांनीं त्याला फरफरा ओढून जागें केलें. त्यासरसा तो उठून चकित होऊन पहातो तों ते सर्व यमदूत त्याच्या पुढें असलेले त्यानें पाहिले आणि आतां पळून जाण्याची कांहीं आशा नाहीं असें जेव्हां त्यास वाटलें तेव्हां तर तो प्राण जाईसा मोठ्यानें ओरडला. तो ह्मणाला " जमादारसाहेब ! जमादारसाहेब ! वांचवा—वांचवा—माझे प्राण चालले—माझे प्राण चालले—सरकारची द्वाही आहे ! "

रामनाथ ओरडूं लागतांच दरोडेखोरांचा नायक त्रिलोकी त्यास धमकी देऊन ह्मणाला " खबरदार तोंडांतून श्वास टाकशील तर. फार गडबड करशील तर आतांच तुझें नरडें दाबून तुझा प्राण घेईन. येथें कोण तुझा आजोबा तुला वांचवितो पाहूं ? लुच्चा, बाईल बनून पळून चालला होता ! तुला वाटलें असेल आह्मांला कशाचा पत्ता लागतो. जा पळ आतां कोठें पळतोस तें. " याप्रमाणें बोलत बोलत त्या दुष्टानें रामनाथाचे हातपाय खूप जोरानें आवळून बांधले. तेव्हां रामनाथाचा अगदीं निरूपाय झाला. तो अगदीं गयावया करून त्यांना

विनवूं लागला कीं मला मारूं नका. मी तुमची गोष्ट यत्किंचित् देखील बाहेर फोडणार नाहीं. "

यावेळीं रामनाथ इतका विलाप करून रडत होता कीं तें पाहून एखाद्या पाषाणासही पाझर फुटले असते. परंतु या दुष्ट दरोडेखोरांचीं अंत:करणें तर पाषाणापेक्षांही कठीण झालीं होतीं. त्यांना कशाची दया येते ? रामनाथाचें रडणें ऐकून ते अधीकच संतापले. तेव्हां त्यापैकीं एकजण ह्मणाला " वाहवारे वाहवा केवढा पण सत्यवादी झाला आहे. ह्मणे सोडून द्या. हा कोणाला कांहींएक सांगणार नाहीं असें होतें तर चौकीवर कशाला येऊन निजला होतास. बेटा आह्मालाच पागल बनवूं पहात आहे. "

याप्रमाणें त्याचें भाषण संपल्यावर रामनाथानें पुन्हा एकदां चौकीदारास हाक मारण्याचा प्रयत्न केला. तो ह्मणाला " मला असें माहीत नव्हतें कीं येथली चौकी प्राणरक्षण करणारी नसून प्राण घेणारी आहे. असें जर मला पहिल्यानेंच कळतें तर मी जाणूनबुजून येथेंच कशाला मरायला आलों असतो. "

रामनाथ जेव्हां अधिक बरळूं लागला तेव्हां त्या दुष्टांनीं त्याचे तोंडास चिरगुटाचा बोळा देऊन तें बंद केलें. आणि मग त्यांनीं त्याची गठडी बांधून त्यास तेथून उचललें. चौकीची जागा उघड्या मैदानांत असल्यामुळें तिच्या असपास लोकवस्तीचें नांवही नव्हतें. दरोडेखोरांनीं बेधडक रामनाथास जें तेथून उचललें तें थेट पद्मा नदीच्या कांठीं आणून सोडिलें. या वेळीं तें स्थळ इतकें भयाण दिसत होतें कीं प्रत्यक्ष पिशाच्चांनाहीं तेथें भीति वाटावी. आसपासच्या सर्व लोकांना तें दग्याचें स्थळ माहीत असल्यामुळें त्या स्थळीं तेवढ्या रात्रीं कोणीही मनुष्य येण्याचा संभव नव्हता. फार तर काय दिवसा देखील त्या स्थळीं एकसारखी उदासीनताच वास करी.

त्या ठिकाणीं आल्यावर रामनाथास वाटलें आतां आपला अंतसमय

श्वास जवळ आला. आतां थोड्याच वेळांत या देहरूप पंजरांतून प्राण-रूप पक्षी उडून जाणार तर यावेळीं नारायणाचें तरी स्मरण करावें. ह्मणजे कांहीं देहसार्थक झाल्यास होईल. मग तो त्या दुष्टांची प्रार्थना करून त्यांस ह्मणाला. " बापहो, तुमचा हेतु मला पूर्णपणें कळून चुकला. तुह्मी माझी इहलोकची यात्रा आतां लवकरच समाप्त करणार याकरितां एकवेळ मला मुक्त कंठानें परमेश्वराचें भजन करूंद्या. "

रामनाथाचें भाषण ऐकून त्या दुष्टांपैकीं एकजण ह्मणाला तुझा मतलब आह्मी पूर्णपणें जाणून आहोंत. गुलाम कसा कावेबाज आहे पहा! जराशी रात्र राहिली आहे ती याच्या गाण्यांत निघून गेल्यावर मग आमचें काम कसें साधणार. असल्या गोष्टी आह्मी पूर्णपणें जाणून असतो. "

दुसरा एकजण ह्मणाला " हा मोठा मतलबी दिसतो. याल वाटलें असेल कीं हा भजन करूं लागला ह्मणजे तें ऐकून कोणी माणसें इकडे येतील पण या स्थळीं मनुष्य तर काय पण चिटपांखरूं फिरकावयाचें नाहीं हें कोठें त्यास माहीत आहे. "

त्यावर रामनाथ ह्मणाला " भाई, तुह्मी ह्मणतां तेंच खरें; मी कोठें कोणाच्या येण्याची आशा करितो आहे. मला फक्त या शेवटच्या घडीला परमेश्वराचें स्मरण करावयाचें आहे तें करूं द्या. मी कांहीं फार वेळ लावीत नाहीं. माझें भजन संपताच एकदम प्राण घेणें तुमच्या हातचेंच आहे. "

रामनाथाच्या भाषणानें त्या दरोडेखोरांना कांहींशी दया येऊन त्यांनीं त्यास भजन करण्याची परवानगी दिली. रामनाथ गाऊं लागला. त्याचा कंठ इतका मधुर होता कीं तो ऐकून गंधर्वानींही क्षणभर विस्मित व्हावें. मग इतरांची काय कथा. बिचारे दरोडेखोर तर अगदीं वेडे होऊन नाचूं लागले. एकजण ह्मणाला " वस्तादजी आह्माला जर असें माहीत असतें तर ढोलगी घेऊन नसतो आलों. " दुसरा ह्मणाला " मी आपली मंजीरी नसती आणली. " तिसरा ह्मणाला " माझी एक-तारी तर यावेळीं काय बहार करून देती. "

अहाहा ! परमेश्वरानें या सृष्टींत गायन ही एक अजब चीज उत्पन्न केली आहे. अशी निर्दोष आणि क्षणांत चित्ताला मोहून सोडणारी दुसरी वस्तूच नाहीं. आमच्या देशांत तर जन्मकालीं, मृत्युकालीं, सुखांत, दु:खांत, खुषींत आणि आनंदांत सर्वत्र गाणें वास करीत असतें. या कलेची या देशांत जशी उन्नती झाली आहे तशी दुसऱ्या कोणत्याही देशांत झाली नाहीं. परंतु मोठ्या खेदाची गोष्ट आहे कीं उत्तरोत्तर या कलेची आमच्या देशांतही पायमल्ली होत आहे. हा सर्व कालमाहिमा आहे. इतर सर्वच गोष्टींत जर हिंदुस्थानास उतरती कळा लागली आहे तर याच गोष्टीची तरी उन्नती कोठून व्हावी. असो.

रामनाथ गायन कलेंत चांगलाच प्रवीण असल्यामुळें त्यानें आपल्या गायनप्रभावानें त्या दरोडेखोरांना अगदीं पूर्णपणें भारून टाकिलें. तो उत्तररात्रीचा समय असल्यामुळें रामनाथानें भैरवीचा सूर काढून पुढील पद्यानें परमेश्वर गुणानुवाद गाण्यास सुरवात केली.

॥ पद्य ॥

॥ येईंहो पांडुरंगे, जिवाचे जिवलगे येईं० ॥ पालुपद ॥ कनवाळू कृपाळू दासालागीं मोही । गजेंद्राचा धावा त्वां केला विठाई ॥ १ ॥ भक्ताच्या कारणें कष्टलीस विठ्ठले । अंबऋषि कारणें जन्म दहा घेतले ॥ २ ॥ उपमन्यु कारणें कष्टलीस विठाई । पाजी प्रेम-पान्हा क्षीरसागरा ठायीं ॥ ३ ॥ प्रल्हादा कारणें स्तंभीं अवतार धरिला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ४ ॥ कौरवें पांचाली सभेमाजी आणिली । वस्त्रहरणा कैशी धावलीस विठाई ॥ ५ ॥ दुर्वास पातले धर्म छळावया वनीं । कैशी धावलीस शाखा देठ घेऊनि ॥ ६ ॥ कनवाळू कृपाळू भुक्तिमुक्तिभांडार । करीं माझा आंगिकार तुका ह्मणे विठ्ठले ॥ ७ ॥

---

## भाग पांचवा.

दिवस ढळता होत चालला आहे. आणि सूर्यनाराण हळु हळु पश्चिमेकडे इतका खालीं गेला आहे कीं तो आतां क्षितिजाखालीं गडप होण्याच्याच बेतांत आहे असें ह्मटलें तरी चालेल. गोवारी गुरें चारून आपआपल्या घरांकडे माघारे फिरत आहेत. चिमण्या चिंव चिंव शब्द करीत आपल्या घरट्यांत शिरत आहेत. अशा वेळीं आमचा हरनाथही दिवसभर काबाडकष्ट करून परत घरीं आला. घरांत येतांच खांद्यावरील ओझें खालीं ठेवून तो आंत गेला. इतक्यांत दामिनीनें तांब्याभर पाणी आणि हुक्का त्याचे पुढें ठेवून उभ्याउभ्याच त्यास ह्मणाली " बाबू, आज तुमच्या जिवास कसें काय वाटतें ? तोंड फारच उतरलेलें दिसतें. "

त्यावर हरनाथ ह्मणाला " बाळे, आज काय झालें असेल तें असो माझ्या अंगाचे आज झोकांडे जात आहेत. तसेंच हातपाय देखील अगदीं गळून गेले आहेत. माझ्या चित्ताला आज कांहीं चैन पडत नाहीं. वरचेवर जीव घाबरल्यासारखा होतो आणि पहावें तिकडे मला उदास भासतें. आजचा सारा दिवस असाच गेला. रामूला जाऊन आज पांच दिवस झाले अजूनही तो माघारा येत नाहीं त्यामुळें माझ्या जिवास मोठा घोर लागला आहे. मला कांहीं त्याचें सुचिन्ह दिसत नाहीं. तो एकदां धड हातींपायीं माझे दृष्टीस पडला ह्मणजे मिळविली. आज माझी तहानभूक देखील नाहींशी झाली आहे. "

वरीलप्रमाणें भाषण करून हरनाथानें हातपाय धुतले आणि ईश्वरस्मरण करून तो आपल्या बिछान्यावर पडला आणि पडल्या पडल्याच त्यानें हुक्क्याचे दोन झुरके घेतले. इकडे दामिनी स्वयंपाकघरांत जाऊन आपल्या खाण्यापिण्याची तजवीज पहात होती. थोड्या वेळानंतर हरनाथानें तिला हाक मारून ह्मटलें "बेटा दामिनी, मला फार मोठें हिंव भरून आलें

आहे. माझे अंगावर आणखी कांहीं तरी पांघरूण घाल आणि पिण्याकरितां एक पेलाभर पाणी घेऊन ये. "

तें ऐकून दामिनी एक चांगली जाड रजई आणि पेलाभर पाणी घेऊन तेथें आली. हरनाथानें तें पेलाभर पाणी तर एका घोटासरसें पिऊन टाकिलें आणि दामिनीकडून रजई पांघरून घेऊन दडपून निजला. परंतु त्याचे अंगांत असें भयंकर हिंव भरलें होतें कीं अंगावरील रजई थाड थाड वर उडत होती. त्यावर दामिनीनें आणखी एक रजई आणून घातली. तरी देखील त्याच्या अंगांतील कांपरें जाईना. फार तर काय दामिनीनें घरांतील पांघरण्याचीं सगळीं वस्त्रें त्याचे अंगावर घातलीं तथापि हिंवाचा जोर एक लवलेशही कमी झाला नाहीं. दामिनीनें शेवटीं त्याचे भोवतीं झगझगीत पेटलेल्या शेगड्या देखील पेटवून पाहिल्या परंतु व्यर्थ. तापाचा जोर अधिकच वाढत चालला. आजचा ज्वर मर्यादेबाहेरचा आहे ही गोष्ट हरनाथाचेही मनांत येऊन चुकली. कां कीं त्याच्या उभ्या आयुष्यांत त्याला असा ज्वर कधींच आला नव्हता. क्षणोक्षणीं त्याची तहान वाढत चालली. डोळे इंगळासारखे लाल झाले. त्याचें डोकें तर जणूं दगडासारखें जड होऊन गेलें होतें आणि त्यांत वाताचाही वेग वाढूं लागला.

त्यावेळीं हरनाथ दामिनीला ह्मणाला " बाळे, मी कांहीं आतां जगत नाहीं. माझें मरण अगदीं जवळ येऊन पोचलें आहे. मरणाचें कांहीं मला दुःख नाहीं पण यावेळीं राम जवळ असतां तर बरें झालें असतें. त्याच्या साठीं माझा जीव तिळतिळ तुटतो आहे. अजूनही ज्याअर्थी तो परत येत नाहीं त्याअर्थी त्याजवर कांहींतरी संकट गुदरलें असावें असें वाटतें. ज्या गांवीं तो गेला आहे तिकडची वाट मोठी खडतर आहे. तेथें दिवसाढवळ्या देखील दरोडे पडतात. कोण जाणे पोरावरती काय प्रसंग येऊन पडला आहे. तसें नसतें तर येव्हांना तो खास परत येता. "

त्यावर दामिनी ह्मणाली " बाबूजी, असें घाबरूं नका ! तुह्मीच असा धीर सोडिलात तर कसें बरें होईल. कोणाला कधीं दुखणें बाहणें येत नाहीं कां ? भैया देखील आज नाहीं उद्यां खास येईल. कसा तरी तो आपल्या सासुरवाडीस गेला आहे. त्याच्या सासूनें पाहुणचारासाठीं दोन दिवस त्याला राहून घेतलें असेल. अथवा तिला आपली मुलगी सासरीं धाडावयाची आहे तेव्हां तिला देखील तयारीसाठीं एक दोन दिवस अधिक लागणेंही स्वाभाविकच आहे. तुह्मी असें घाबरूं नका. आतां सकाळ होतांच वैद्याला बोलावून आणितें. चार दिवस औषधपाणी घ्यां ह्मणजे ताप बरा होईल. घाबरण्याचें काय कारण आहे. "

हरनाथ हंसून ह्मणाला " बाळे, मी कां पोर आहे ? आणि तूं जरी आपल्याला अगदीं आजीबाई समजत असलीस तरी माझ्या लेखीं तूं मात्र पोर आहेस खरी. माझ्यापुढें तुझें शहाणपण किती. आतां जिव्हाळ्याच्या बाजूनें तूं माझें पाहिजे तितकें समाधान कर पण माझ्या जिवाची पूर्ण खात्री होऊन चुकली आहे कीं आजचा ताप मला घेऊनच जाणार. तें कांहींही असो. प्राणिमात्राला केव्हांना केव्हां तरी मरण हें आहेच. पण आजच्या रात्रींच जर माझें कांहीं बरेंवाईट झालें तर तूं एकटी काय करशील ? यासाठीं गयाराम जर घरांत असेल तर त्याला बोलावून आण. "

पित्याची आज्ञा होताच दामिनी गयारामास बोलावण्यासाठीं त्याचे घरीं गेली. या ठिकाणीं आह्मी आपल्या वाचकांस गयारामाची जरा जास्त ओळख करून देतो. गयाराम जातीचा वैश्य असून नात्यानें हरनाथाचा चुलता होत होता. त्याचें वय सुमारें तीस वर्षांचें होतें. त्याचा रंग काळा आणि हातपाय मजबूत असून शरीरकांठी उंच ढांगळ होती. तसेच त्याचे तोंडावर थोडेसे देवीचेही वण होते.

त्याला कुटुंबपरिवार वगैरे कांहींएक नव्हतें. एक ह्मातारी आई होती

तिलाही मरून यावेळीं दोन वर्षें लोटलीं होतीं. गयारामाचें एक वेळ लग्न झालें होतें परंतु लग्नानंतर सहाच महिन्यांनीं त्याची बायको मृत्युवश झाली. गयारामानें आपले लग्नाचे वेळीं मोठ्या हौसेनें पुष्कळ खर्चवेच केला होता. परंतु दुर्दैवानें थोड्याच काळांत धर्मपत्नीचा वियोग झाल्यामुळें त्यानें पुनरपि लग्न न करण्याचा निश्चय केला होता. हा त्याचा निश्चय केवळ सद्धेतूनेंच होता असें नाहीं. असा निश्चय करण्याचे एक अंतस्थ कारण होतें तें वाचकांना पुढें आपोआपच कळेल.

गयाराम संपत्तीनें चांगला गबर होता. त्याचा बाप त्या गांवांत एक मोठा मातबर व्यापारी ह्मणून मानला जात होता. कापडाच्या व्यापारांत त्यानें चांगली कमाई केली होती आणि मरते समयीं रोख दहा हजार रुपये त्याच्या शिलकींत होते. बापाचे पश्चात् त्या सर्व संपत्तीचा गयारामच मालक होता. आपल्या कारकीर्दींत गयारामानें कांहीं शेतवाडीही केली होती. त्यामुळें त्याला तिकडूनही वर्षाच्या बेगमीचें धान्यधुन्य येत असे. याप्रमाणें गयाराम चांगला धनधान्य संपन्न असल्यामुळें त्याला आपल्या चरितार्थाची मुळीं देखील चिंता नव्हती.

गयारामानें जरी विवाहित न होण्याचा निश्चय केला होता, तरी त्याचें वर्तन मात्र सन्मार्गाला धरून नव्हतें. गयाराम प्रथम पासूनच दामिनीकडे विषमदृष्टीनें पहात असे. आणि त्याच्या सुदैवानें ह्मणा अगर दुर्दैवानें ह्मणा बिचारी दामिनीही लग्नानंतर दोनच वर्षांनीं विधवा झाली. दामिनीच्या सासरीं एका दिराशिवाय दुसरें कोणीही नव्हतें आणि त्याचाही दामिनीकडे विशेषसा ओढा नव्हता. त्यामुळें ती आपल्या बापाच्याच घरीं राहूं लागली. त्यावेळीं तिचें वय चांगलें पंधरा सोळा वर्षांचें झालें होतें. तिच्या नाकडोळ्यांत अथवा रंगरूपांतही कोणत्याही तऱ्हेचा उणेपणा नव्हता. गयारामाचें घर अगदीं हरनाथाच्या घराला लागूनच होतें. तिकडे गयारामाच्या घरांत कोणीही त्याला दडपता नव्हता. इकडे दामिनीही घरांत सदा एकटीच असावयाची. एकतर पूर्ण

यौवनाची उभार, दुसरें सुंदर रूपाचें ईश्वरी देणें आणि तिसरें मनमुराद स्वातंत्र्य. इतकी सामुग्री असल्यावर मग व्यभिचाराचा अग्नि शिलगण्यास काय वेळ लागणार आहे. येथें कोणी अशी शंका घेतील कीं नवयौवन संपन्न आणि परम रूपवती अशा दामिनीचें गयारा-मासारख्या कयाहीन आणि कुरूप पुरुषावर कसें प्रेम जडलें ! परंतु या जगांत नेहमीं प्रेम अंधळेंच असतें व त्याचा अनुभव मोठमोठ्या महर्षि-नाही प्राचीन कालापासून आला आहे. पूर्णाधिकारी स्मृतिकार मनु ह्मणतातः—

**नैता रूपं परीक्षन्ते नासां वयसि संस्थितिः ।**
**सुरूपो वा कुरूपो वा पुमानेवोपभुञ्जते ॥ १ ॥**

दामिनीचें हें स्वैर वर्तन हरनाथाच्याही नजरेस आलें होतें. परंतु काय कारणानें असेल तें असो तोही तिच्या दुर्वर्तनाकडे कानाडोळाच करीत असे, आणि आपण कारणच शोधूं लागल्यास ह्मातान्याच्या बुद्धि-भ्रंशावांचून आपणाला दुसरें कांहींएक कारण सांपडण्यासारखें नव्हतें. शेजारधर्मास्तव गयाराम हरनाथाला समयानुसार पैसाअडका अथवा चीजवस्त पुरवून चांगली मदत देत असे. हरनाथाचा गयारामावर पूर्ण विश्वास होता. हरनाथ आपल्या मुलास बरोबर घेऊन जेव्हां फेरीस जाई तेव्हां आपलें घर गयारामाच्याच स्वाधीन करून जात असे. शिवाय अलीकडे हरनाथ एका गोष्टीनें गयारामाचा बराच मिंधा झालेला होता. ती गोष्ट ही कीं रामनाथाचे लग्नाचे वेळेस गयारामानें त्यास पन्नास रुपये बिनव्याजी हातउसने ह्मणून दिले होते. अशा अनेक कारणांनीं गयारामाच्या वर्तनावर सक्त करडी नजर ठेवण्याचें त्याला धैर्य झालें नसावें असें वाटतें. तात्पर्य गयाराम आणि दामिनी यांच्या अपवित्र प्रेमांत अंतर करण्यासारखी एकही गोष्ट नव्हती.

जाऊं द्या. ही पापमय कर्मकथा आतां आह्मी जास्त वाढवूं इच्छित नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें दामिनी गयारामाचे घरीं गेली. आणि लागलींच त्यास आपले घरीं घेऊन आली. तीं दोघें घरीं येऊन पहातात

तों हरनाथाची प्रकृति बेसुमार बिघडली होती. यावेळीं त्यास वायु होऊन त्याच्या लहरींत तो बडबडूं लागला होता. आपल्या समोर कोण आलें आहे हेंही त्यास ओळखूं येईनासें झालें होतें. तो सर्व प्रकार पाहून गयाराम दामिनीस ह्मणाला " यांच्या प्रकृतीचें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं पण तूं कांहीं घाबरूं नकोस. मी एक चांगला वैद्य बोलावून आणितों. आपणाकडून शक्य तितका प्रयत्न आपण करीत असावे. पुढें ईश्वराची मर्जी. त्याला जसें करावयाचें असेल तसें तो करील. "

याप्रमाणें बोलून गयाराम चटपट तेथून चालता झाला. दामिनी आपल्या पित्याच्या उशाशीं बसून राहिली. हरनाथाची प्रकृति प्रतिक्षणीं एकसारखी अत्यवस्थ होत चालली होती. त्याला तहान अशी जबर लागली होती कीं कांहीं केल्या तो तोंडास लाविलेलें भाडें दूर करीत नसे. आणि एका भाड्यांतलें पाणी संपतांच दुसरें भाडें पुढें न केल्यास शिव्यागाळी देऊन ओरडूं लागे. केव्हां केव्हां वायूच्या लहरींत बिछान्यावरून उठून धावूं लागे. त्याला एकटी दामिनी कोठवर संभाळणार ? ती त्याला बिछान्यावर आणून निजविता निजविता अगदीं दमून गेली. एवंच हरनाथाच्या शरीरावर सन्निपाताचा पूर्ण पगडा बसला.

इतक्यांत गयाराम वैद्यास घेऊन आला. कृष्णराम वैद्य त्या वेळीं त्या गांवांत चांगलाच प्रसिद्धीस येत चालला होता. कृष्णरामास वैद्यकीचें पूर्ण ज्ञान होतें असें नाहीं. परंतु त्याचा पिता चांगला सुजाण वैद्य होता. कृष्णराम लहान असतांच त्याचा देहांत झाल्यामुळें त्याला आपल्या पित्याच्या संपूर्ण शिक्षणाचा लाभ झाला नाहीं. तथापि त्यांचे घरीं ग्रंथसंग्रह चांगला असून पूर्वापार तयार झालेलीं अनेक रसायनादि औषधेंही पुष्कळ होतीं. कृष्णरामाला रोगाची परीक्षा जरी तात्पुरतीच होती तरी त्याच्या औषधानें अनेक रोगी बरे होऊन हळुहळू त्याची गणना नामांकित वैद्यांत होऊं लागली होती.

कृष्णरामानें हरनाथाची नाडीपरीक्षा केली. त्याला त्याच्या

नाडीचा कांहींच पत्ता लागेना. एक वेळ दोनवेळ तीनवेळ सोडून पांचवेळ त्यानें पुन्हां पुन्हां नाडी पाहिली. परंतु प्रत्येक वेळीं त्यास निराळें लक्षण दिसे. कधीं मंद, कधीं शीघ्र, कधीं पित्ताची तर कधीं कफाची अशी अनेक प्रकारची नाडी त्यास भासूं लागली. ती क्षणांत स्थानत्याग करी आणि क्षणांत पूर्वस्थळीं येई. हरनाथाला श्वासोश्वास करण्यासही अत्यंत आयास पडत होते. त्याची दृष्टि मुळीं देखील स्थिर नव्हती. अशा प्रकारचीं लक्षणें पाहून वैद्य गयारामास ह्मणाला " रोग तर असाध्यच झालेला आहे परंतु मी आपली खात्रीची मात्रा देऊन पहातो. लागू झाली तर ठीकच आणि ही जर लागू न झाली तर मात्र कठीणच समजा. " असें ह्मणून त्यानें आपला बटवा सोडला. आणि त्यांतून कित्येक डबे, डब्या, कुप्या आणि बेलीं बाहेर काढिलीं. त्यानें कांहीं वेळ औषधांची उलटापालट करून एक निराळी पुडी बनविली. व ती पुडी गयारामाचे हातीं देऊन तिची पुष्कळशी प्रशंसा केल्यावर अनुपान वगैरे सांगून वैद्यराज कृष्णरामजी परत जावयास निघाले. जातां जातां आपल्या औषधाची पुन्हां एकदां प्रशंसा करून ते ह्मणाले " मी दिलेली मात्रा आपला चमत्कार दाखविल्यावांचून मात्र राहावयाची नाहीं. असलीं औषधें आह्मी वाटेल त्यास देत नसतो. परंतु तुमचा आमचा ऋणानुबंध फार ह्मणूनच या ठिकाणीं तें मी दिलें. जाऊं मी आतां ? "

गयारामानें वैद्यबोवांचा हेतू जाणून चार रुपये त्यांचे मुठींत घातले आणि शिष्टाचाराच्या भाषणांनीं त्यांची रवानगी केली. इकडे हरनाथाची प्रकृति पंथास लागलेलीच होती. गयारामानें औषध देण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु यावेळीं त्यांचे सर्व प्रयत्न व्यर्थ होते. पहाटे तीन वाजण्याचे सुमारास हरनाथाच्या देहावसानाची पूर्ण लक्षणें दिसूं लागलीं. तेव्हां गयाराम दामिनीस ह्मणाला " आतां यांची कोणत्याही तऱ्हेनें आशा राहिली नाहीं करितां यांना आतां येथून उचलून ऊर्णावस्त्रांवर अंगणांतच नेऊन ठेविलें पाहिजे. "

हरनाथाच्या पुढील कष्टदायक अवस्थेचें जास्त वर्णन करून आमच्या कोमल अंतःकरणाच्या वाचकांस आह्मी शिगवूं इच्छित नाहीं. गयाराम आणि दामिनी या दोघांनीं त्यास अंगणांत आणिल्यावर थोड्याच वेळानें त्याचा आत्मा या नश्वर जगास सोडून पुण्यलोकीं गेला. पित्याच्या परलोक गमनानें दामिनी खरोखरच अत्यंत कष्टी झाली. याचें कारण उघड आहे. आजवर पिता असल्यामुळें स्वैरवर्तनावर एकप्रकारचें पांघरूण असें त्याच्या पश्चात् आतां पांघरूण घालणारा कोणीच राहिला नाहीं यामुळें तिला बरेंच अवघड वाटूं लागलें.

हरनाथास जाऊन दोन तीन दिवस झाले तरी देखील रामनाथाची कांहींएक खबर कळेना. चौथे दिवशी नावाड्यांनीं येऊन खबर दिली कीं "इकडून जातेवेळीं आमच्या नावेवर रात्रीचेवेळीं दरोडा पडला. त्यावेळीं आह्मी नदींत उड्या टाकून आपला बचाव केला. आमचे बरोबर रामनाथ बाबूंनींही उडी टाकिली होती. सकाळ झाल्यावर नदीच्या कांठीं जाऊन आह्मी त्याचा पुष्कळ शोध केला. परंतु त्यांचा आह्मांस कांहींच तपास लागला नाहीं. आमची नाव मात्र जागच्या जागीं जशीच्या तशीच बांधलेली आह्मांस सांपडली. ती घेऊन आह्मी सारा दिवसभर तहानभूक सोडून साऱ्या नदीभर त्यांचा शोध केला. तरी देखील आह्मास जेव्हां त्यांचा कांहींच मागमूस लागेना तेव्हां निरूपायास्तव आह्मी माघारी परतलों. आणि कदाचित् ते घरी आले असतील तर पहावें ह्मणून तलास करण्यासाठीं येथें आलों."

नावाड्यांचें भाषण ऐकतांच दामिनी आक्रोश करून मोठमोठ्यांनीं रडूं लागली. तिचें रडणें ऐकून शेजारून गयाराम धांवत आला. आणि त्यानें तिची अनेक प्रकारें समजूत केली. तो ह्मणाला " रामनाथाच्या जिवास मुळीं देखील धोका झालेला नाहीं; तूं अगदीं घाबरूं नकोस. त्याच्या शोधार्थ मी मनुष्य पाठवितो. बहुधा तो चोरांच्या भीतीनें नदींतून

पोहत पोहत दूर एखाद्या गांवीं गेला असेल तूं आतां स्वस्थ ऐस. ” इतकें बोलून गयारामानें रामनाथाच्या शोधार्थ माणसें रवाना केलीं.

---

## भाग सहावा.

त्या मायामय जगदीश्वराची लीला अशी अपरंपार आहे कीं तिचा आजपर्यंत कोणालाही अंत लागला नाहीं आणि पुढें लागणें केवळ अशक्य होय. तो नानानाटकसूत्रधार या जगतीरूप नाट्यमंचकावर जीवमात्राला अशा रीतीनें खेळवितो कीं, जशी कांहीं कळसूत्री खेळांतील लाकडाचीं बाहुलींच. तो केव्हां सिंहासनाधिपति राजाला अगदीं रंक बनवून देशोदेशीं आणि रानोरानीं भटकावयास लावितो आणि कधीं एखाद्या सामान्य मनुष्याला छत्रसिंहासन देऊन त्याचे मस्तकीं चौऱ्या वारवितो. कधीं मोठमोठ्या शरीरसंरक्षकांच्या जाबत्यांतूनही एखाद्या शूर राजाला एखाद्या अनाथाप्रमाणें हिरावून नेतो; आणि कधीं रस्त्यावर पडलेल्या अनाथ दीनांचें मोठ्या अजब रीतीनें संरक्षण करितो. या भूतलावर त्या लीलानायक जगदीश्वराच्या अघाटेत लीलांचीं अनेक उदाहरणें नित्यशः दृष्टीस पडतात आणि तीं पाहून परम नास्तिकांच्या मुखांतूनही त्या अनंत शक्ति परमेश्वराच्या अस्तित्वाचे उद्गार निघूं लागतात. ते ह्मणतात “ निसंशय हे अघटितघटना—पटुत्व अलक्षरूपानें कोणातरी अपार सामर्थ्याच्या सत्वावांचून असणें शक्य नाहीं. ”

नदी किनाऱ्यावर ज्या ठिकाणीं दरोडेखोरांनीं रामनाथाला मारण्याच्या विचारानें आणिलें होतें तेथून थोड्या दूर अंतरावर पोलिस इन्स्पेक्टराची नाव उभी होती. त्या नावेवर पोलिस इन्स्पेक्टरबाबू, त्याचा नोकर, एक चपराशी आणि पांचसांत इतर पोलिस शिपाई इतकी मंडळी होती. नाव पोचण्याला उशीर झाल्यामुळें ते लोक चौकीवर न जातां त्याच ठिकाणीं

नाव खुंटवून रात्र घालवीत होते. यावेळीं उत्तर रात्रीचा सुमार असल्यामुळें ते सर्वजण जागे झाले होते. इन्स्पेक्टर बाबू नोकराकडून गुडगुडी तयार करवून तिचे झुरके घेत बिछान्यावर स्वस्थ पडले होते. इतक्यांत त्या गंभीर शांततेच्या वेळीं कंठमधुर गायनाचा सूर त्यांचे कानीं पडला. बाबूसाहेब जात्या गायनप्रिय होतेच आणि त्यांतही तो प्रभातकालचा सुमार. चहूंकडे शांतता आणि त्यांतही सशास्त्र मधुर गायनाची उत्पन्न झालेली लहर इत्यादि कारणांनीं बाबूसाहेबांचें चित्त असें रिझलें कीं ते बिछान्यावरून उठून गुडगुडी हातीं धरून तिचे झुरके घेत घेत नदी-किनाऱ्यानें जिकडून तो गंधर्वतुल्य मधुर गायनाचा ध्वनि येत होता त्याच्या सुमारीवर चालले. त्यावेळचा चंद्रप्रकाशही मनुष्याची चांगल्या प्रकारें ओळख पटविण्यासारखा असल्यामुळें बाबूसाहेबांनीं या दरोडेखोर मंडळींस तेव्हांच ओळखिलें. त्यांनीं पाहिलें तों चार पांच सडेसोट जवान हातांत सोडगे घेऊन एका मनुष्याला ठार करण्याच्या उद्देशानें घेरून उभे राहिले आहेत आणि त्यांच्या तावडींत सांपडलेला मनुष्य दीनवाणीनें आपल्या अंतकाळीं परमेश्वराची प्रार्थना करीत आहे असें त्यांस पूर्णपणें समजून आलें. त्याबरोबर ते उभे असल्या जागींच थबकले. इतक्यांत चोरांपैकीं एकजण ह्मणाला " अरे याच्या ताना रीरींत काय तुह्मी मग्न झालां ? आतां अगदीं पांढरें फुटण्याचा समय झाला आहे करितां लवकर याचें चंदन करून टाका. नाहीं-तर पुरतेंच फशीं पडाल. "

चोराचें वरील भाषण ऐकून तर इन्स्पेक्टर बाबूंची त्यांच्या दुष्ट हेतूबद्दल खात्री झाली. त्यांनीं लागलींच भोलासिंग नावाच्या नोकरास हाक मारून त्याजला नावेवरील सर्व लोकांस हत्यारबंद करून घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. भोलासिंगाच्या मुखानें बाबूसाहेबांची आज्ञा कळतांच नावेवरील सर्व लोक हत्यारबंद होऊन कडेकोट तयारीनें बाबूसाहेबांपाशीं येऊन उभे राहिले.

इकडे इतकें सर्व झालें तरी तिकडे त्या दुष्टांना या गोष्टीची मुळीं देखील दाद नव्हती. ते आपल्या मतें अगदीं निर्भयपणें बिचाऱ्या रामनाथाचा प्राणनाश करण्यास अगदीं सज्ज झाले होते. परंतु ह्मण आहे ना " ज्याला देव तारी त्याला कोण मारी ? " आपले सर्व लोक तयार होऊन येताच पोलिस इन्स्पेक्टरानें त्या दुष्टांवर असा अचानक छापा घातला कीं यांना पाहतांच त्यांची भीतीनें अगदीं पाचावर धारण बसली. फार तर काय त्यावेळीं ते अगदीं शक्तिहीन झाल्यासारखे झाले. मग काय ? पोलिसच्या लोकांना कांहींएक श्रम न पडतां त्यांनीं त्यांच्या मुसक्या बांधून जागच्या जागींच त्यांना बंदिवान करून टाकिले आणि इन्स्पेक्टर साहेबांनीं स्वतः आपल्या हातांनीं रामनाथाला बंधमुक्त करून आपल्या नावेवर घेतलें. तेथे गेल्यावर रामनाथानें आपली साद्यंत हकीकत त्यांना निवेदन केली. ती ऐकतांच त्यांनीं दोन पोलिसचे शिपाई आणि दोन नावाडी यांना दरोडेखोरांच्या पहाऱ्यावर ठेवून आपण स्वतः बाकीच्या लोकांसह चौकीवर जाऊन एकदम तेथील लोकांसही त्यांनीं बांदिवान केलें. आणि नंतर ते लागलीचच्या लागलीच रामनाथास बरोबर घेऊन आपल्या सदर ठाण्यावर गेले.

याप्रमाणें अद्भुत रीतीनें रामनाथाची सुटका होऊन तो आपल्या प्राणसंकटांतून वांचला. शिरस्त्याप्रमाणें दरोडेखोरांची चवकशी होऊन चौकीवरील जमादारासुद्धां सर्वांना त्यांच्या त्यांच्या गुन्ह्याप्रमाणें शिक्षा झाली. त्यांत त्रिलोकी आणि ताराचंद आदिकरून दरोडेखोरांना जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा झाली आणि जमादार वगैरे फितूरी पोलिसांस दहा दहा वर्षांची सक्तमजूरीची शिक्षा झाली.

रामनाथास अशा प्रकारचीं अनेक विघ्नें आल्यामुळें परत घरीं येण्यास दहा बारा दिवसांचा अवधि लागला. शिवाय त्याचे हातीं पैसा अडका वगैरे कांहीं नसल्यामुळेंही त्याचे फार हाल झाले. तथापि लोकांनीं धर्मार्थ दिलेल्या पैशांनीं परत तो कसातरी मार्ग चालून घरीं येऊन पोहोंचला.

रामनाथाला पुनरपि सासुरवाडीस जाण्याची इच्छा झाली नाहीं. प्रत्यक्ष त्याच्या मेव्हण्यामुळेंच त्याजवर भयंकर संकट गुदरलें होतें व त्या संबंधांत त्याला आपल्या बायकोचाही संशय आला होता. काय चमत्कार आहे पहा. ज्या कुसुमनें स्वतःचे प्राण गहाण ठेवून त्याच्या संरक्षणाचा उपाय योजिला होता तीच कुसुम आपणावर पुढील संकट आणण्यांत सामील होती अशाविषयीं रामनाथास पक्का संशय येऊन चुकला. त्याला वाटलें आपल्या स्त्रीनेंच आपल्या पळून जाण्याची बातमी दिली आणि चौकीवाले लोक आपल्या भावाशीं मथलेले आहेत ही गोष्ट ठाऊक असतांही तिनें आपणास निमूटपणें चौकीकडे लावून दिलें. अशा एक ना दोन अनेक विरुद्ध कल्पनांनीं त्याचें अंतःकरण भरून गेलें आणि तो जों जों अधिक विचार करी तों तों त्याला आपल्या सासूच्या आणि पत्नीच्या वर्तनाविषयीं अधिक अधिक संशय येई. आणि तदुत्पन्नक्रोधानें त्याचें अंतःकरण जळूं लागे.

हरएक मनुष्याला प्रसंग विशेषीं कमी अधिक प्रमाणानें भ्रांती होत असते. या जगांत आजपर्यंत भ्रांतिरहित असा मनुष्य कोठेंही उत्पन्न झाला नाहीं आणि पुढेंही होण्याची संभावना नाहीं. आज जे आपणाला निभ्रांत समजत आहेत तेच लोक कांहीं दिवसानंतर खुद्द आपणाविषयींच भ्रांत होऊं लागलेले दिसतात. सुदैवानें ज्यांना उत्तमप्रकारचें शिक्षण प्राप्त झालें आहे आणि ज्यांचें अंतःकरण सुसंस्कृत झालें आहे ते लोक मात्र बहुधा या भ्रांतिरूपी जखिणीच्या झपाट्यांत गवसत नाहींत. परंतु दुर्दैवानें ज्यांना शिक्षणाचा गंधही लागलेला नाहीं ते लोक यःकश्चित् गोष्टींचा विपरीत अर्थ घेऊन भ्रांतिरूप वनांत एखाद्या बुजलेल्या जनावराप्रमाणें वणवण फिरूं लागतात. खरोखर भ्रमरहित मनुष्य नेहमीं अनेक दुःखपरंपरेच्या जाचांतून मुक्त असतो. आणि भ्रमजालांत फसलेला मनुष्य न्यायाला अन्याय, अन्यायाला न्याय, सत्य तेंच मिथ्या आणि मिथ्या तेंच सत्य समजून अनेक प्रकारच्या चिंतांनीं व्याप्त होत्साता मरमर फिरूं लागतो.

रामनाथाचीही तींच अवस्था झाली होती. विनाकारण दूषित कल्पनांच्या जाळ्यांत फसून तो अकर्तव्याला कर्तव्य, आणि कर्तव्याला अकर्तव्य मानून भ्रांतिरूपी अंधकारमय गुहेंतून आपला मार्ग चाचपीत होता. त्याच्या सर्व भ्रमाचा परिणाम बिचाऱ्या कुसुमला मात्र बिनतोडपणें भोगावा लागला. आपल्या पत्नीला प्राण गेला तरी आतां घरीं ह्मणून आणावयाचें नाहीं असा रामनाथानें निश्चय केला.

मागें सांगितल्याप्रमाणें रामनाथ आपल्या घरीं येऊन पोहोंचला तेव्हां त्याची बहीण दामिनी दरवाज्यांत बसून दीन वदनानें विलाप करीत असलेली त्याचे दृष्टीस पडली. तीस रामनाथानें घाबरून विचारिलें " ताई तूं अशी रडत कां बसली आहेस ? मला येण्यास उशीर लागल्यामुळें मजवर कांहींतरी संकट गुदरलें असेल असें जाणून तूं दुःख करीत असशील आणि दुर्दैवानें तुला आलेला संशयही खराच होता. मी केवळ वडिलांच्याच पुण्याईनें आलेल्या संकटांतून बांचलों. नाहींतर हा तुझा भाऊ फिरून तुझ्या दृष्टीस पडण्याची कांहीं आशा नव्हती. मजवर गुदरलेल्या प्रसंगाची सर्व हकीकत मी तुला मागाहून सांगेन. पण बाबूजी कोठें आहेत ? त्यांची प्रकृति तर ठीक आहेना ? "

रामनाथाचें भाषण ऐकून दामिनी अधीकच विलाप करूं लागली. त्यावरून आपला पिता हयात नसावा अशी रामनाथाची खात्री झाली. तो बिचारा एका दुःखांतून पार पडतो न पडतो तोंच हें पित्याच्या मरणाचें दुसरें दुःख त्याच्या पुढें दत्त ह्मणून उभेंच होतें. मग त्यानें दीर्घश्वास सोडून दामिनीची समजूत घातली आणि तिच्या मुखानें पितृनिधनाची समग्र हकीकत ऐकून घेतली. नंतर आपणावर गुदरलेल्या संकटाची साद्यंत हकीकत तिला सांगून आपल्या पत्नीला पुन्हां इकडे न आणण्याचा निश्चयही त्यानें तिला कळविला.

रामनाथ घरीं आल्यावर त्याचा पहिला दिवस तर केवळ दुःख करण्यांतच गेला. दुसरे दिवसापासून त्याला पित्याच्या उत्तरकार्याची चिंता

लागली. खुद्द त्याचे जवळ तर एक कवडीही नव्हती. त्यानें हरनाथाची पेटी उघडून पाहिलें तों तींत सारे दहाच रुपये निघाले. रामनाथाला मोठा भरंवसा होता कीं आपल्या पित्याजवळ कांहींतरी मोठी पुंजी असेल. परंतु तो त्याचा मोठा भरंवसा पेटींतील रुपयांनीं तर अगदीं फोल करून टाकिला. मग त्यानें आपल्या पित्याच्या निजावयाच्या खोलींतील जमीन खोदण्यास आरंभ केला. तेव्हां तींत मात्र त्याच्या कल्पनेप्रमाणें त्याला आपल्या पित्याची थोडीशी तरी ठेव सांपडली. तो खोलींतील जमीन खणीत असतां बापाच्या उशाखालच्या जमीनींत पुरून ठेवलेला एक जडसा बटवा त्याचे हातीं लागला.

बटव्यांत निव्वळ सुरती रुपये भरून ठेविलेले होते. रामनाथानें हळूसा तो बटवा खोलला. तेव्हां त्यातील रुपये पाहून त्याचें चित्त आनंदभरानें अगदीं गद्गद होऊन गेलें. त्यानें हळूहळू ते सर्व रुपये बटव्याबाहेर काढून त्यानें मोजण्यास आरंभ केला. एकवेळ दोनवेळ तीनवेळ असे अनेकवेळ ते सर्व रुपये त्यानें मोजून पाहिलें. एकवेळ मोजून रुपये बटव्यांत घालणार तोंच त्याला ते पुन्हां मोजून पाहण्याची इच्छा होई. मग त्यानें त्या सर्व रुपयांच्या कित्येक राशी बनविल्या आणि त्यांचेकडे पाहून कांहीं विचार केल्यासारखें करून त्यानें पुन्हां एकवार त्या सर्व रुपयांची खानेसुमारी केली ! आणि शेवटीं मोठ्या कष्टानें ते सर्व रुपये त्यानें त्या बटव्यांत भरिले.

रामनाथाचें चालचलन पहिल्यापासून अतीशय बिघडलेलें होतें. परंतु पिता विद्यमान असतां त्याला मनसोक्त वर्तन करण्यास तितकी सवड सांपडत नसे. शिवाय पित्याचे हयातींत खुद्द रामनाथाजवळ सदां पैशांची टंचाईत असे. त्यामुळें आजपर्यंतच्या त्याच्या वर्तनाला निसर्गतः एकप्रकारचा आवर होता. परंतु पित्याच्या पश्चात् त्याला आतां दाही दिशा मोकळ्या झाल्यासारखें झालें. उत्तरोत्तर त्याचें वर्तन बेसुमार बिघडत चाललें. त्यानें आपल्या पित्याच्या उत्तरकार्यास

फक्त दहाच रुपये लाविले होतें ! परंतु पुढें आपल्या चैनीकरितां दहांच्या कितीतरी पट रक्कम तो नित्यशः उडवूं लागला. आपली स्त्री आपले सन्निध आणावयाची नाहीं असा त्याचा निश्चय असल्यामुळें त्याला बाहेरख्यालीचा अतोनात नाद लागला. तो आतां कित्येक दिवसांत आपल्या घराचें दर्शनही घेईनासा झाला. रात्रंदिवस वारयोषितांच्या घरीं राहून त्यांच्या विलासांतच अक्षयी मग्न होत असे. उभ्या महिन्यांतून दोन चार वेळ घरीं आल्यास येई आणि तो तरी साऱ्या दिवसाकरितां नसे. केवळ चार सहा घटका थांबून पुन्हां परत जाई. अशा रीतीनें दोन तीन महिने लोटले. त्याची बहिण दामिनीही त्याला घरीं राहण्याविषयीं फारसा आग्रह करीत नसे. कां कीं तो घरीं असला ह्मणजे हिच्या सुखांत अंतर पडे. त्यामुळें तो जितका बाहेर असेल तितकें तिच्या पथ्यावरच पडे. रामनाथ स्वतः विषयलंपट बनल्यामुळें आपल्या बहिणीच्या वर्तनाविषयीं सदा आंधळाच असे. याप्रमाणें तीं दोघें बहिणभावंडें आपआपल्यापरी दुर्वर्तनी आणि कुमार्गगामी बनलीं.

तिकडे कुसुमच्या मातेला आपल्या मुलांची झालेली दुर्गति पाहून फारच वाईट वाटलें. तिनें त्यांना वाटेवर आणण्यासाठीं आपले प्राण पाखडिले. तथापि ते कर्मचांडाल तिच्या एका शब्दालाही मान देत नसत. त्याचा परिणाम त्यांना यथायोग्य रीतीनें भोगावा लागला. बिचारी माता मात्र पाठीमागें त्यांच्या वियोगदुःखानें तळमळत राहून त्यांच्याहूनही प्रबलतर दुःखाची विभागी होऊन बसली ! अहाहा मातेचें प्रेम किती तरी अघटित. तिचा स्नेह कितीतरी विचित्र आणि तिचा कळकळा कितीतरी अलौकिक होय. पोटचा पुत्र कितीही क्रूर, कपटी, कुव्यसनी निघाला तरी त्याजवरून मातेची ममता लवमात्रही कमी होत नाहीं. पुत्रानें कितीजरी कष्ट दिले तरी मातेला त्याचा शीण वाटत नाहीं. या सृष्टींत जर कोठें खऱ्या ममतेचें विहारस्थान असेल तर तें एक मातेचें अंतःकरणच मात्र होय.

कुसुमनें आपल्या मातेचें अनेक प्रकारे सांत्वन केलें तेव्हां तिची वृत्ती बरीच स्थिर झाली. कांहीं दिवसानंतर कुसुमच्या मातेनें आपल्या मुलीस सासरीं पाठविण्याचा विचार केला. परंतु एकुलती एक कन्या सासरीं गेल्यावर आपल्याला येथें मुळीं देखील करमणार नाहीं हाही विचार लागलींच तिच्या चित्तांत उद्भवला. तिकडे कुसुमला वाटत होतें कीं आतां आपल्या मातेस आपल्यावांचून दुसरें कोणी राहिलें नाहीं. आपण गेल्यावर तिची धडगत होणें नाहीं. त्यापेक्षां तिला आपले बरोबरच घेऊन जावे हें उत्तम. कांहीं दिवस माझ्यापाशीं राहून एकदां तिचें चित्त स्थिर झालें ह्मणजे पाहिजे तर परत येईल. या तिच्या विचारास आईचाही रुकार पडला. मग त्या दोघींनीं घरांतील चिजवस्त शेजाऱ्याचे घरीं ठेवून वसतपुरास जाण्याकरितां एक भाड्याची नाव केली.

वाट चालतां चालतां त्या मायलेकीच्या मनांत अनेक प्रकारचे कल्पनातरंग उठत होते. कुसुमची माता आपल्या मनांतल्या मनांत ह्मणाली "हाय हाय ! माझ्या पोटीं पुत्र झाले असूनही सांप्रत मी निपुत्रिक झालेंना ! असो. भगवंताची मर्जी त्याबद्दलचे विचार मनांत देखील आणणें व्यर्थ आहे. तर मग आतां, काय करावयाचें ? वास्तविक पाहतां जांवई आणि पुत्र कांहीं भिन्न नाहींत. करितां यापुढें निदान जांवयाच्या तोंडाकडे पाहून तरी माझा जीव थंड राहील. आणि उरलेले आयुष्याचे दिवस त्याच्याच पाशीं काढीन. लोक ह्मणतील कीं ही ह्मातारी आतां लेकीच्या दारांत जाऊन बसली. विचार करतां तिकडूनही कमीपणाच आहे. पण मी तरी तसें कां करीन ? पहिल्या पासूनच मी आपली एक वेगळी खोली घेऊन स्वतंत्रपणें राहीन. मला एकटीला असें काय लागावयाचें आहे. महिन्याचे कांठीं दोन अडीच रुपयांचें धान्यधुन्य भरून घेतलें, एकवेळ रोटी केली आणि दोनवेळ खाल्ली ह्मणजे झालें. माझ्या प्रपंचाचें असें काय मोठें अवडंबर असावयाचें आहे. शिवाय आज मित्तीस तरी मी कांहीं तशी कफल्लक झालें नाहीं. घरांत दहावीस भांडीकुंडी आहेत. हातात दोन

सोन्याचीं वेढीं आहेत. शिवाय थोडेसे किरकोळ पैसेही आहेत. परमेश्वर कृपेनें मला केवळ लेकीच्याच दारीं जाऊन पडावयाला नको. आणि तितकेंही करून जर तिच्याच घरीं राहण्याचा प्रसंग आला तर जांवई आणि मुलगा कांहीं दोन नाहींत. संकट प्रसंगीं लोकेषणाकडे लक्ष देऊन कोठवर चालणार. माझ्या सारख्या दुर्दैवी आया या जगांत कितीक तरी पडल्या असतील. देवांचें देणें असलें तर कुसुमला वर्ष दोन वर्षांत एखादा मुलगा होऊन माझ्या नेत्रांचें पारणें फेडील आणि मग त्यानें जरी मला लाथेनें झुगारिलें तरी देखील माझी मृत्तिकेची सद्गति होईल. याप्रमाणें तिच्या मनांत कल्पनांचा ओघ वहात असतां कुसुमही आपल्या मनांत अनेक विचारांच्या मनोराज्यांत गढून गेली होती. ती ह्मणाली " मला पाहतांच प्रथमतः तर त्यांना (पतीला) त्या दिवशींच्या रात्रीची सर्व हकीकत आठवेल. त्यावेळीं माझे भाऊ त्यांच्या प्राणावर उदार झाले असतां मी आपल्या भावांची पर्वा न करितां त्यांचा प्राण वाचविला आहे ही गोष्ट ते विसरले नसतील. ते आपल्याकडून त्यावेळीं मला सासरीं न्यावयास आले होते. परंतु मध्यंतरीं तिसरेंच विघ्न उभें राहिल्यामुळें त्यांना आपला जीव घेऊन परत घरीं जावें लागलें परंतु आतां मला पाहतांच ते आनंदित झाल्यावांचून रहावयाचे नाहींत. "

या प्रकारच्या रुचकर कल्पनांच्या कितीही इमारती जरी कुसुमच्या कल्पनांनीं उभ्या केल्या तरी दुर्दैवानें त्यांतील एकही कळसास जाण्याचा यावेळीं संभव नव्हता. आपण सासरीं गेल्यावर आपल्या मस्तकीं घोर विपत्तींची काळींभोर आभाळें फिरूं लागणार आहेत, याची त्या बिचारीला यत्किंचित् देखील आशा नव्हती.

हे आशा देवि, धन्य तुझा महिमा ! तुझी माया तूंच जाणेस. जो तुझ्या मायेनें मोहित झाला नाहीं अथवा तुझ्या मोहजालांत अडकला नाहीं असा या सृष्टींत कोण बरें आहे. अत्यंत दीन, हीन आणि मलीन वस्त्र

धारण करणाऱ्या अखंड भिक्षेकऱ्याच्या हृदयांत देखील तूं भावी सुखाच्या कल्पित चित्राच्या सत्यतेचे रंग असें तकतकीत भरून देतेंस कीं ज्याप्रमाणें दुपारच्या उन्हानें तापलेला आणि तहानेनें व्याकूळ होऊन घाबरलेला हरिण एखाद्या वाळूच्या रणरणीत मैदानांत अगाध जलाच्या भ्रांतीनें भटकत असतो आणि त्याला शीतल वृक्षांच्या तळाशीं तुडुंब पाण्यानें भरलेले तलाव दिसतात तद्वतच वरील कंगाल मनुष्याची स्थिति होते. मृग जसा जलाच्या भ्रांतीनें मोठमोठालीं आरण्यें ओलांडितो आणि अखेरीस त्याला जसा जलाचा एक टिपूसही प्राप्त होत नाहीं तद्वतच भोळेपणानें आशेची कास धरून तिच्या मागें धाव घेणाऱ्या लोकांची अंतीं निराशा होते. हे आशा देवि, या जगांत जिकडे पहावें तिकडे तुझा प्रभाव दिसून येतो. तुला आमचा नमस्कार असो.

यथाक्रमानें मार्गक्रमण झाल्यावर त्या दोघी मायलेकी वसंतपुरास येऊन पोचल्या. आणि घरीं गेल्यावर कुसुमनें पाहिलें तों आपलें सासरघर रिकामें पडलें असून एक प्रकारची उदासीनता त्या ठिकाणीं भासत होती. तिनें घरांत जाऊन पाहिलें तों एकटी दामिनी एका खोलींत बसलेली तिचे दृष्टीस पडली. कुसुमनें लागलीच तिला नमस्कार करून घरांतील माणसांचें कुशल विचारिलें. ती ह्मणाली " वन्सें, तुह्मी आज्ञा उदासवाण्या तोंडानें एकट्याच कां बसला आहांत ? मामंजींची प्रकृति ठीक आहेना ? बाकींचीं माणसें कोठें आहेत ? " या तिच्या प्रश्नांचें दामिनीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती अधिकच गाल फुगवून घुम्यासारखी बसली. दामिनीचें तें वर्तन पाहून कुसुम चकित होऊन ह्मणाली " कांहो वन्सं, तुह्मी बोलत कां नाहीं. असें झालें तरी काय ? माझ्या मागें इकडे कांहीं वरें वाईट तर झालेलें नाहीं ना ? "

तिचें असें काकुळतीचें भाषण ऐकूनही दामिनीच्या हृदयास द्रव आला नाहीं. ती एकदम रागानें विजेसारखी कडकडून कुसुमला ह्मणाली " चल निघ येथून. मोठी आली आहे सासरच्यांच्या मायेची ! अग तूं

माणूस आहेस कीं जखिण आहेस ? मला वाटतें चेटकिणी, डाकिणी, हडळी अथवा राक्षसीणी यांपैकीं तूं कोणी तरी आहेस. प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याचाही प्राण घेण्याचा प्रयत्न करण्यास तूं कचरली नाहींस तर तुला आतां काय ह्मणावें. तुझें तर मुखावलोकनही महत्पापास कारण होईल. तूं आलीस तशी येथून परत चालती हो. ”

याप्रमाणें दामिनीच्या मुखांतील तें अशनिपातासारखें भयंकर आणि कठोर भाषण ऐकून बिचारी कुसुम अगदीं भस्मसात होऊन गेली. तिला तिच्या ह्मणण्याचा कांहींच अर्थ समजेना. दामिनीच्या भाषणाचा वज्राघात कांहींसा कमी झाल्यावर कुसुम अगदीं जपून तिला ह्मणाली “ वन्सं, तुह्मी काय कारणानें मजवर इतक्या रागावला आहां तें मला कांहींच कळत नाहीं. तुमचें भाषण तर मला सर्वथा निराधार वाटत आहे. खरोखरच तुमची कोणी तरी भलती समजूत केली असल्यास तुह्मी पुन्हां एकवार नीट चौकशी करून पहा. मला तर माझा लवभर देखील अपराध वाटत नाहीं. मग तुह्मांला कोणी काय सांगितलें असेल तें ईश्वर जाणें. ” कुसुमचें तें अत्यंत नम्रपणाचें भाषण ऐकून दामिनी बरीच थंड झाली. आणि नंतर तिनें आपल्या भावाच्या मुखानें ऐकिलेलें सर्व वर्तमान तिला जसेच्या तसेंच सांगितलें. वाचकहो त्यावेळीं कुसुमच्या अंतःकरणाची काय स्थिति झाली असेल याची तुह्मीच कल्पना करा. बिचारी कुसुम मोठमोठ्यानें आक्रोश करून रडूं लागली आणि आपल्या नणंदेस ह्मणाली “वन्सं माझें नशीबच असें फुटकें नाहींतर असा खोटा कलंक मला कां लागता? खरोखर स्वतःच्या प्राणाची पर्वा न करितां त्यांचे प्राण वाचविण्याची मी युक्ति योजिली असतांही त्यांनींच मला आपली प्राणघातिनी समजावें हें खरोखरच माझें खडतर दुर्भाग्य होय. माझ्या मनांत जर त्यांचा प्राण घ्यावयाचा होता तर त्यांना बायकोचा वेष देऊन मी घरांतून कां पळविलें असतें ? भावांपाशीं खोटें कां बोललें असतें आणि स्वतःचा जीव संकटांत कां घालते ? एकूण माझ्या त्या वेळच्या प्रयत्नाचा त्यांना विपरीत हेतू भासला. माझें कपा-

ळच फुटकें खरें. मला अभागीला यमाच्या घरीं तरी जागा आहे कीं नाहीं कोण जाणे. या समयीं मला मरण येईल तरी देखील फार बरें होईल. ह्मणजे या मृत्युलोकच्या दुर्धर यातनांतून तरी सुटेन."

एवढा वेळपर्यंत कुसुमची आई अगदीं चकित झाल्यासारखी होऊन मुकाट्यानें स्वस्थ बसली होती. परंतु कुसुमचा आक्रोश ऐकून मात्र तिच्यानें बोलल्या वांचून राहवेना. ती ह्मणाली "माझ्या पोरीचा यत्किंचित् देखील अपराध नाहीं खरोखर व तिनें त्या वेळीं पतिव्रतेचें कर्तव्य बजाविलें, माझ्या दुराचारी पुत्रांची हकीकत सर्व जगाला जाहीर झाली असतां ती तुह्मालाच तेवढी कशी कळली नाहीं. ती तुह्माला कळती ह्मणजे माझ्या पोरीच्या निर्दोषपणाबद्दल तुमची खात्री झाली असती."

याप्रमाणें त्या दोघी मायलेकींचीं भाषणें ऐकून दामिनीच्या अंतःकरणांत केवळ सत्याचा प्रकाश पडला. आणि आपला भाऊ केवळ संशयरूप राक्षसणीच्या दुस्तर जालांत सांपडून फसला आहे अशी तिच्या मनाची खात्री झाली. असें जरी होतें तरी तिनें वर मात्र तसें दाखविलें नाहीं. कां कीं कुसुमचें आणि तिच्या मातेचें घरांत रहावयास येणें तिच्या पथ्याचें नसून उलट तिला वावडेंच होणारें होतें. ती एकटी घरांत असतांना तिला जसें मनसोक्त पापाचरण करावयास सांपडे, तसें यापुढें कसें करावयास सांपडणार ? अशा रीतीनें या दोघी आल्यापासून दामिनीच्या कपाळांत एकसारखा सूळ उभा राहिला होता. तीस कुसुमच्या मातेनें पुन्हां एकदां विचारिलें "आमचें ह्मणणें नाहीं कां तुमच्या गळीं उतरलें ? आह्मी दोघी जें सांगत आहों त्यांत असत्याचा एक लवलेशही नाहीं."

त्यावर दामिनी कांहींशीं चिडल्यासारखी होऊन ह्मणाली "मला तुमचें ह्मणणें खरें वाटो अगर खोटें वाटो. त्याचा तुह्माला काय उपयोग. रामनाथ भैयानें मला जी हकीकत सांगितली तीच मी तुह्माला सांगितली. आतां ती तुह्माला खोटी वाटणारच. पण या तुमच्या खऱ्याखोट्याच्या भानगडीशीं मला काय करावयाचें आहे आणि क्षणभर समजा

कीं तुमचेंच ह्मणणें आतां मला खरें वाटत आहे पण या संबंधांत माझ्या काय हातचें आहे. ''

कुसुमच्या मातेला दामिनीच्या भाषणाचा सर्व रोख समजला. त्यावर ती तिला जास्त कांहींच बोलली नाहीं. फक्त " जांवई कोठें आहेत? ते बरे आहेत नां ? त्याही कोठें घरांत दिसत नाहींत कोठें बाहेर गेले आहेत कीं काय ? " वगैरे प्रश्न केले. त्यावर दामिनीनेंही आपल्या पित्याच्या मृत्यूचें दुःखकारक वर्तमान त्यांना सांगून रामनाथाच्याही वर्तनाचें दिग्दर्शन केलें. त्यावेळीं मात्र पित्याच्या स्मरणानें आणि भावाच्या अनिवार दुर्वर्तनानें दामिनीस बराच गहिंवर आल्यामुळें तिच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु गळूं लागले, ते पाहून कुसुमाच्या पोटांतही एकदम भडभडून आलें. आणि क्षणमात्र तें स्थळ दुःखशोकाचें केवळ अधिष्ठानच भासलें.

शेवटीं कुसुमच्या मातेनें तिची अनेकप्रकारें समजूत केली. चार बोधाच्या गोष्टी सांगितल्या आणि तिचा शोकावेग कमी केला. ती ह्मणाली " एकदां दुर्दैवाची वारीं वाहूं लागलीं ह्मणजे तीं मनुष्यांना अशीं चहूंकडून नागवितात. परंतु अशा वेळीं मनुष्यानें धीर सोडतां कामा नये. विधिलिखित कांहीं टळत नसतें. तुझेही ह्मणजे असेच दिवस राहतील असें नाहीं. आज नाहीं उद्यां केव्हां तरी रामनाथाची तुझ्या निर्दोषपणाबद्दल खात्री होऊन तो तुझा अंगिकार करील. "

वरीलप्रमाणें समाधानाचें भाषण करून कुसुमच्या आईनें खाण्यापिण्याची तरतुद केली. त्या दोघी मायलेकी साऱ्या दिवसाच्या उपाशी असून घोटभर पाणी देखील त्यांच्या पोटांत गेलेलें नव्हतें. वरील सर्व हकीकत होईपर्यंत भाड्याच्या पैशासाठीं घरापर्यंत आलेले नावाडी अजून परत गेले नव्हते. त्यांचेच हातीं कुसुमच्या आईनें शिधा पाणी आणवून आपली तरतूद करून घेतली, परंतु दामिनीनें एका शब्दानेंही त्यांची विचारपूस केली नाहीं.

---

## भाग सातवा.

प्रस्तुतकाळीं रामनाथाची पूर्वीची उद्दामवृत्ति जाऊन तो अगदीं नम्रवृत्तीनें वागूं लागला होता. उघडच आहे हातीं पैसा नसल्यावर उद्दामपणा कोठून राहणार ? या सृष्टीतील सर्व खेळ आणि ख्याली खुशाली केवळ पैशाच्या आहेत. आणि तोच पैसा जर जवळ नसला तर मनुष्याची सर्वतोपरि मानहानि होत असते. द्रव्याचा महिमा फार मोठा आहे. त्याच्या योगानें निर्बळ प्रबळ होतात. मूर्ख पंडित ह्मणविले जातात आणि दुर्जनांचीही अनेक प्रकारें स्तुति होऊन ते प्रशंसेस पात्र होतात. धनवान् मनुष्य नेहमीं गर्वांध झालेला असतो. त्याला जगांतील बऱ्यावाईटाची मुळीं देखील चाड रहात नाहीं. एका संस्कृत कवीनें ह्मटलें:—

॥ अहो कनक महात्म्यं वक्तुं केनापि शक्यते ॥
॥ नामसाम्यादहोचित्रं धत्तूरोपि मदप्रदः ॥ १ ॥

तात्पर्य धनवान सदा बेपर्वाई असून उच्छृंखलवृत्तीनें राहतो. त्याचें हृदय तर वज्रापेक्षांही कठोर होऊन जातें. आणि तेंच धन एकदां हातचें नाहींसें झालें ह्मणजे लागलींच सर्व मन्वंतर फिरतें. प्रत्यक्ष जिवलग ह्मणविणारे मित्र देखील त्या निर्धन मनुष्याशीं शत्रुत्वानें वागूं लागतात. रामनाथाचीही सांप्रत तीच अवस्था झालेली होती. त्याच्या जवळचें बहुतेक द्रव्य खर्च होत आलें असून उरलेल्या अल्प द्रव्यांत आपला गुजारा कसा लागेल या गोष्टीची चिंता रात्रंदिवस त्याचे चित्तास जाळूं लागली. ज्या त्याच्या इष्टमित्रांना त्याच्या वांचून क्षणभर देखील चैन पडत नसे तेंच आतां दोन दोन चार चार दिवसांत देखील त्याच्या घराचें दर्शन घेईनासे झाले. पूर्वीं कोठेंही जरी गाण्याबजावण्याची बैठक झाली तरी तेथें प्रथम रामनाथ आला आहे किंवा नाहीं ह्मणून चौकशी होत असे. परंतु ती सर्व रति सांप्रत रामनाथाला सोडून गेली होती. पहा रामनाथाच्या दुकानापासून जवळच

कांहीं अंतरावर दहा पांच मंडळी बसून मोठ्या आनंदानें गायनाचा बहार लुटीत आहेत आणि इकडे रामनाथ एकटाच आपल्या दुकानावर बसून चिंताक्रांत होत्साता आपल्या मागील सर्व दुर्वर्तनाचें सिंहावलोकन करीत आहे. ते वेळीं तो आपल्या मनाशीं ह्मणाला " मी लहान असतां माझ्या बापानें मला विद्या शिकविण्याविषयीं कधीं रागानें, कधीं लाडानें, कधीं धाक दाखवून, तर कधीं ताडनही करून कितीतरी खटपट केली. तो शेवटीं हरला परंतु मी ह्मणून कधींही मन लावून विद्याभ्यास केला नाहीं. शिवाय रिकामटेकड्या लोकांच्या संगतीस लागून व्यापारधंद्या-चेंही ज्ञान करून घेण्याचें मीं सोडिलें ! त्यावेळीं तर असें वाटत असे कीं एकदां ह्मातान्याचा कांटा दूर झाला ह्मणजे मनास वाटेल तसें वर्तन करून सुख भोगण्यास सापडेल. परंतु माझा तो केवळ भ्रम होता. मला मूर्खाला त्यावेळीं असें कळलें नाहीं कीं पित्याच्याच जिवावर निर्भर राहून ज्या प्रकारचें वर्तन आज आप-णास करावयास सांपडत आहे त्याच प्रकारचें वर्तन त्याच्या पश्चात् कसें निभणार ? त्यावेळीं मनाला चिंतेचे नांव देखील नसे आणि दुसरे कोणी चिंता करितांना पाहून मी त्यांना ह्मणे कीं चिंता करण्यापासून काय होणार आहे. आहे त्यांत खावें, प्यावें आणि मौज करावी. परंतु आज जेव्हां मजवरच चिंता करण्याचा प्रसंग येऊन पडला तेव्हां तो सर्व वेदांत मी विसरून गेलों. मला कांहींएक सुचेनासें झालें आहे. अंगीं थोडीशी जरी विद्या असती तरी तिचा याप्रसंगीं किती तरी उपयोग झाला असतां आज मला लोकांना तोंड दाखविण्याचीही चोरी वाटत आहे. पूर्वी मला वाटत असे कीं पुष्कळ खर्च करून लोकांना मेजवान्या दिल्या आणि गाण्याबजावण्याचे थाट उडविले ह्मणजे लोकांत आपली कीर्ति होते. परंतु तो माझा समज निव्वळ चुकीचा होता यांत संशय नाहीं. माझा पिता कोठें गाण्यांच्या बैठकी करीत होता ? त्याचा सारा जन्म गरीबी रीतीनेंच वागण्यांत गेला. तथापि

या गांवातील अनेक संभावित लोक त्याला मान देत असत. आज तेच लोक माझ्याशीं भाषण देखील करण्यास लाजतात. ते मला लंपट, व्यभिचारी आणि उधळ्या मानून माझी निंदा करितात. खरोखर ! मी कितीतरी अभागी ! आतां काय करावें. आतां आपणास पैसा कसा मिळेल आणि नित्याचा चरितार्थ तरी कसा चालेल याचीच मला मोठी चिंता वाटत आहे. "

वर वर्णन केल्याप्रमाणें रामनाथ चिंताक्रांत होऊन दुकानावर बसला असतां एक मनुष्य हळूहळू पावलें टाकीत आणि गालांतल्या गालांत हंसत हंसत त्याजपाशीं आला. त्याचें वय आदमासें पंचवीस वर्षांचें होतें. रंग सावळा. शरीर दुहेरी. ओंठावर नुकतेच मिशांचे अंकूर फुटत आहेत. नेत्र लहान. त्याला पाहतांच हा मोठा धूर्त मनुष्य असावा असें सहज अनुमान होण्यासारखें होतें. त्यानें आपल्या डोक्यांवरील केसांचा ऐटदार भांग काढिला होता. हातांत एक पातळशी वेताची छडी घेतली होती. अंगांत कोट, त्यावर घड्याळ. याप्रमाणें त्याचा सर्व डौल छान छोकीचा होता.

हा मनुष्य इतका हळूहळू आला होता कीं त्याच्या येण्याची रामनाथाला मुळीं देखील चाहूल लागली नाहीं. रामनाथ असा एकाग्र होऊन बसलेला पाहून त्यानें त्याचे पाठीवर हळूच थाप मारिली आणि हंसून ह्मटलें " कांहो दोस्त आज अगदीं चिंताक्रांत होऊन बसला आहांत ? दुकानांत कोणी आल्याची देखील शुद्ध नाहीं हें कसें काय!"

त्याचें भाषण ऐकतांच रामनाथ चपापून ह्मणाला. " अहाहा, कोण गोपीनाथ ? आज दोन तीन दिवस कोणाकडे होतास ? इकडे अगदीं तोंड देखील दाखविलें नाहींस तुझी अवस्था तरी काय आहे ? "

वरील अभ्यागताचें नांव गोपीनाथदास, जात कायस्थ, बसंतपुरचाच राहणारा. गोपीनाथाच्या घरीं त्याची आई बाप आणि एक धाकटा भाऊ इतकीं माणसें होतीं. गोपीनाथाचें लग्न झालेलें नव्हतें. त्याच्या बापाची

थोडीशी जमीदारी असून तिच्याच उत्पन्नावर त्यांचा घरचा प्रपंच निर्वाह होत होता. गोपीनाथाची चाल चालणूक बरी नव्हती. व त्यामुळें त्यानें आजपर्यंत लग्न होण्याचें राहिलें होतें. त्याच्या पित्यानें पुष्कळ प्रयत्न करून पाहिला परंतु गोपीनाथा सारख्या छाकट्या मुलास आपली मुलगी देण्यास कोणीही धजावेना. गोपीनाथ दुर्व्यसनी आणि दुर्वृत्तनी तर होताच परंतु तो व्यसनाप्रीत्यर्थ आपल्या पदरचा एक पैसाही कधीं खर्च करीत नसे. नेहेमीं दोन चार लक्ष्मीवानांच्या मुलांना असे बनवून ठेवीत असे कीं त्यांनीं आपल्या घरच्या दौलतींतून उमोप पैसा उडवावा आणि गोपीनाथानें त्यावर खुशाल चैन उडवावी. या त्याच्या मताप्रमाणें रामनाथाचा पिता स्वर्गवासी होताच त्यानें रामनाथास गाठिलें आणि त्याला ख्याली खुशालीच्या नादीं लावून त्याच्या पैशावर यथेच्छ मौज मारण्यास सुरुवात केली. प्रथमारंभीं रामनाथास त्यानें आश्वासनपूर्वक वचन दिलें होतें कीं माझ्या बापाची संपत्ती माझ्या हातीं येईपर्यंत आपल्या उभयतांच्या चैनीकरितां तूं पैसे खर्च करावेस. आणि तुझे पैसे खर्च झाल्यावर माझे आहेतच मी तुला कोणत्याही गोष्टीचें कमी पडूं देणार नाहीं. परंतु हा सर्व त्याचा तोंडचाच जमाखर्च होता हें चाणाक्ष वाचकांस कळेलच. असो. गोपीनाथ रामनाथास ह्मणाला " प्रथम माझ्या प्रश्नाचें उत्तर दे आणि मग तुझें काय ह्मणणें आहे तें मी ऐकून घेईन. "

**रामनाथ**—गोपीनाथ भैया, चिंतेचें काय विचारितोस. जवळची जमापुंजी तर संपत आली आतां पुढें उपाय ! पैशा वांचून चरितार्थ तरी कसा चालावा ?

**गोपीनाथ**—अरे चिंता कशाची करतोस ? आपले चैनीला कां कधीं पैशाची उणीव पडणार आहे. तूं त्याबद्दल बेफिकीर रहा. पहा आतां अशी एक शिकार हेरली आहे कीं ज्याचें नांव तें ! हें बघ, सावजीच्या मुलाला मोठ्या खुबीनें आपल्यांत सामील केला आहे.

**रामनाथ**—कोण ? मोधूसावाचा मुलगा जगू ! खरें कीं काय ?

**गोपीनाथ**—अरे हो. मी तुला खोटें सांगतो कीं काय ? आज त्याच्याच बगीच्यांत जलशाचा थाट आहे. तूं जरा उमेद धर विनाकारण कां असा चिंतेच्या फेऱ्यांत पडला आहेस. दोन दिवसाची जिनगानी आहे त्यांत खावें, प्यावें, चैन करावी.

गोपीनाथाचें भाषण ऐकून रामनाथाचें अंतःकरण बरेंच प्रफुल्लित झालें. मग तो चटकन उठून आपला पोषाख घालून गोपीनाथाबरोबर जावयास निघाला. जातां जातां तो त्यास ह्मणाला " आज बरेच दिवसांत मी घरीं गेलों नाहीं करितां प्रथम तिकडे जाऊन नंतर जलशाला जाण्याचें करूं. कांकीं एकदां जलशाच्या तावडींत सांपडल्यावर पुन्हां केव्हां घराची शुद्ध होईल तें कांहीं सांगता येत नाहीं. "

**गोपीनाथ**—अरे, घराकडे काय तुझें ठेविलें आहे ? असें कोण तुझें घरांत आहे कीं त्याजसाठीं तूं इतका उताविळ होत आहेस.

**रामनाथ**—अरे, बहीण आहेना. चट्कन् तिला एकदां भेटूं आणि मग तूं ह्मणशील तिकडे चलूं.

**गोपीनाथ**—तूं तरी मोठा अरसिकच आहेस. लौकर बगीच्यांत जाऊन मौज उडवूं ह्मणतो तर ह्मणे घराकडे चल. अरे आतांची वेळ कां मग येणार आहे ? कोणी पाहिलें आहे आजचा दिवस गेल्यावर आपण जगतो कीं मरतो.

**रामनाथ**—अरे बाबा एकदां तुमच्या तावडींत सांपडलों ह्मणजे पुन्हां लौकर सुटका व्हावयाची नाहीं हें मला पक्कें माहीत आहे. ह्मणून ह्मणत होतो कीं एकवेळ घराकडूनच जाऊन येऊं.

**गोपीनाथ**—अरे तूं आमच्या तावडींत तो काय सांपडावयाचा आहेस. वारुणीला तर तूं शिवत देखील नाहींस. मग तुला अडकून पडण्याची भीति ती कसली ?

**रामनाथ**—तूं ह्मणतोस तें खरें. मला कांहीं तसें भय वाळगण्याचें

कारण नाहीं पण कोण जाणें आज माझें मन घरीं जाण्याविषयीं ओढ घेत आहे याकरितां मी तिकडे जाऊनच येतों. आज तुझा आग्रह राहूं दे.

**गोपीनाथ**—बरें तर जा. पण परत लौकर ये ह्मणजे झालें.

**रामनाथ**—अरे माझा काय तेथें जीव लागणार आहे. मी नुसता उभ्या उभ्या जाऊन येणार.

याप्रमाणें भाषण होऊन ते दोघे आपआपल्या मार्गाकडे वळले. रामनाथानें आपल्या घराच्या उंबरठ्यांत पाऊल ठेवलें मात्र कीं लागलीच क्रोधाग्नीनें त्याच्या अंगाचा अगदीं भडका होऊन गेला. त्याला घराच्या अंगणांतच त्याची सासू आणि बायको दृष्टीस पडल्या. मग त्यांच्याशीं कांहींएक भाषण वगैरे न करितां तो सरळ घरांत बहिणीकडे गेला आणि तिजवर बराचसा ताशेरा झाडून ह्मणाला " कांगे ताई हीं माणसें येथें कां आलीं ? कोणी यांना येथें आणिलें ?

**दामिनी**—त्यांना कोण आणायला गेलें होतें. आपण होऊनच तीं येथें येऊन बसलीं आहेत.

**रामनाथ**—असें काय ? तर मग हा मी येथून निघालों. माझ्यानें नाहीं येथें राहवत. मी इकडे निघालों तेव्हां घरी राहण्याच्या संकेतानें निघालों. होतों. पण आतां नाहीं येथें आपलें मन लागत. आपण जाणार कोठें तरी निघून !

**दामिनी**—जरा थांब. अशी घाई कां ? मी काय ह्मणतें तें जरा ऐक तर खरा. आज कित्येक दिवसापासून रात्रंदिवस तुला भेटण्याची मला इच्छा होत होती. तूं एकदा घरीं यावास ह्मणून मी गणपती देखील पाण्यांत घालून ठेविला होता. असें देवा देवाकरितां एकदांचा आलास आणि आतां याच पायीं जायचें ह्मणतोस हें काय ?

**रामनाथ**—ताई तूं मला अगदीं देखील मोहांत गुंतवू नकोस. ही माणसें येथें आलेलीं पाहून माझ्या अंगाची अगदीं लाही होऊन गेली आहे.

**दामिनी**—पण दुसऱ्याच्या अपराधाकरितां तूं काय ह्मणून शिक्षा भोगणार ! तूं कांहीं त्यांना बोलावणें पाठविलें नव्हतेंस. तीं होऊनच येथें आलीं आहेत. तुझ्या इच्छेस वाटेल तर त्यांना ठेव. नाहींतर जा ह्मणून सांग. पण त्यांच्या रागावर तूं काय ह्मणून घर सोडणार ? निदान आजचा दिवस तर थांब. मला तुला कांहीं सांगावयाचें आहे.

इतकें बोलून दामिनी रामनाथाला घेऊन एकीकडे गेली आणि त्यास ह्मणाली " भैया, माझेपाशीं काय होतें तें तुला ठाऊकच आहे. त्यावरच मी इतके दिवस काढिले. पण आतां मजजवळ एक फुटकी कवडी देखील राहिली नाहीं. आतां माझी पुढें गत तरी काय होणार ? बाबू होते तोंवर तुला बोलण्याचें कारणच नव्हतें. पण आतां मात्र तुझ्यावांचून मला सद्गत राहिली नाहीं. "

**रामनाथ**—तूं न सांगताच मला तुझ्या विषयीं चिंता आहे. नाहीं असें नाहीं पण काय करूं मजपाशीं देखील अलीकडे खर्चाची फारच टंचाई झाली आहे.

इतकें बोलून रामनाथ तेथून निघून बाहेर पडण्याच्याच बेतांत होता. इतक्यांत कुसुम पुढें होऊन झट्कन् त्याच्या पायावर पडली आणि रडत रडत ह्मणाली " नाथ, मी काय आपला अपराध केला आहे ? तुह्मी मजवर कशासाठीं रुसला आहांत ? खरोखर तुह्मी जर माझा त्याग केलात तर या पृथ्वीवर मी कोणाची होऊन राहूं. धरिणी मातेनें दुभंग होऊन आपल्या पोटांत मला ठाव द्यावा. इतकें कोठें माझें पुण्य आहे. "

तें तिचें बोलणें ऐकून रामनाथाचा राग अधिकच वाढत चालला. त्याला तें तिचें भाषण निव्वळ मायावीपणाचें वाटलें. त्याचें अंग थरथर कांपूं लागलें आणि त्या आवेशाच्या भरांत तो ह्मणाला " चल निघ येथून, मायावी राक्षसीण कोठली. आज माझ्यासमोर अगदीं सीता सती आणि पार्वती बनून आली आहे. जणूं काय तुझे सर्वगुण मी विसरलों.

पापिणी, तूं तर माझा प्राणही घेऊन चुकली होतीस. माझ्या पूर्वजांची पुण्याई सबळ ह्मणूनच तुझ्या पैशाचिक कसबांतून मी वाचलों. राक्षसिणी, एकीकडे मला सांगितलेंस कीं चौकीवर जा आणि इकडे आपल्या भावांना अचुक माझे पाठिमागे लाविलेस. तुला वाटत असेल कीं तुझी चतुराई मी समजलों नाहीं पण खूब याद राखून अस आतां तुझ्या तावडींत मी सांपडावयाचा नाहीं. तुला, जर आपलें भलें व्हावें असें वाटत असेल तर याच पायीं माझ्या घरांतून चालती हो. ''

पतीच्या मुखांतून निघालेल्या त्या वज्रप्राय कठोर वाणीनें बिचाऱ्या कुसुमचें हृदय शतधा विदीर्ण होऊन गेलें. तिच्यानें मोठ्यानें देखील बोलवेना. तिचा गळा एकदम दाटून आला तथापि तशा अवस्थेंतही मोठ्या दीनवाणीनें रोदन करून ती आपल्या पतीस ह्मणाली "या जगांत तुमच्या वांचून माझें दुसरें कोण आहे ? तुह्मीच माझे प्राण, तुह्मीच माझें धन, माझा मान, माझी कीर्ती सर्व कांहीं तुह्मीच आहात. तुमच्यामुळेंच माझें या जगांतील वास्तव्य संभवनीय आहे. तुह्मीच जर असे कठोर झालांत तर मी अबलेनें काय करावें. आपल्या पायापाशीं हें नम्र शीर अर्पण केलें आहे. इच्छा असल्यास तारा नाहींतर मारा. '' याप्रमाणें भाषण करीत असतां तिचा गळा अधीकच भरून आला. तिच्यानें पुढें बोलवलें नाहीं. रामनाथासमोर ती अगदीं अचेतन होऊन पडली. त्याचप्रसंगीं तिची आईही पुढें आली आणि रामनाथाचा हात धरून तिनें त्याची पुष्कळ प्रकारें समजूत घालण्याचा प्रयत्न केला. ती ह्मणाली "आह्मांबद्दल तुह्मांला आलेला संशय केवळ निराधार आहे. आह्मी दोघी मायलेकी निर्विवादपणें निर्दोषी आहोंत. आपण आपला विनाकारण भलता समज करून घेतला आहे. ''

तें सासूचें भाषण ऐकून रामनाथाची चित्तवृत्ति द्विधा झाली. त्याच्यानें तिच्या ह्मणण्यावर विश्वासही ठेववेना अथवा सर्वतोपरी अविश्वासही करवेना. असें झालें असतां त्याच्या सासूनें पुन्हां बोलण्यास

आरंभ केला. ती ह्मणाली " रामनाथ, तुह्माला जर आमचें ह्मणणें विश्वसनीय वाटत नसेल तर तुह्मी भवानीगंजास जाऊन तेथील लोकांपाशीं नीट चौकशी करा आणि आपल्या मनाचें समाधान करून घ्या. ते चांडाल कां आमच्या कह्यांत होते ? त्यांच्याशीं आमचा नित्य कलह होतच होता आणि खुद्द तुमच्या संबंधांत तर ते मात्रागमनी आह्मा दोघीनाही ठार मारावयास उठले होते. ईश्वर जाणे आमच्या या जगांत आणखी किती हाल अपेष्टा व्हावयाच्या आहेत. ह्मणून आह्मी त्यांच्या हातून वांचलों ! बाबा त्यांनीं माझें चांगलें सांगितलेलें ऐकिलें नाहीं त्यांचें योग्य फल त्यांना मिळालें. आतां मुलगा ह्मणा कीं जांवई ह्मणा. एक काय ते तुह्मी. मी तर आतां मरणाच्याच दारीं बसलें आहें. जे दिवस जातील ते जातील. आतां राहिली कुसुम तिला तर पांचा परमेश्वरांच्या साक्षीनें तुह्मी आपल्या पदरांत घेतलें आहे. आणि यावज्जीव तिला अंतर देणार नाहीं ह्मणून वाचादत्त झालां आहांत. तुह्मी मानिलें तर ती तुमची राणी आहे नाहींतर बटीक आहे. सर्वतोपरि ती तुमच्या आधीन आहे. इहपरलोकीं तुमची साथीदारीण आहे. तुमच्या पदरांत तिला घालून मी तर मोकळी झालें. तिची आणि तुमची जन्माची गांठ बांधली गेली आहे. तुमच्यावांचून तिला दुसरें शरण नाहीं. याउप्पर जसें तुमच्या चित्तास येईल तसें करा. सासूच्या नात्यानें यापेक्षां अधीक बोलण्याचा माझा धर्म नाहीं. "

इतकें बोलून ती बिचारी वृद्धा मुक्तकंठानें रडूं लागली. आणि कुसुमही तिच्या मांडीवर डोकें ठेवून आणि तिच्या पदरानें आपलें तोंड झाकून हुंदके देऊन रडूं लागली. तो प्रकार पाहून रामनाथही मनांतून अतिशय विरमला. त्याची चित्तवृत्ति फेऱ्यांत पडली आणि शेवटीं " बरें तर मग, मी आज घरींच राहण्याचें करतों " असें ह्मणणें त्याला भाग पडलें.

रामनाथाची चित्तवृत्ति बदललेली पाहून त्याच्या सासूला बरेंच धैर्य

आलें. आणि तिला असाही विश्वास उत्पन्न झाला कीं हळूं हळूं असेंच त्याचें वर्तन सुधारत जाईल आणि नवराबायकोंत पडलेलें हें खडतर वितुष्ट नाहींसें होईल.

" बरें तर मग, मी आज घरींच राहण्याचें करतों " हे पतीच्या तोंडचें अमृत मधुर शब्द ऐकतांच कुसुमच्या हृदयांत आनंदाचा संचार झाला. मग ती मनांतल्या मनांत अनेक प्रकारच्या आपल्या भावी संसारसुखाबद्दल कल्पना करीत करीत ती स्वैपाक पाण्याच्या तयारीस लागली. आणि होईल तितकें करून झटपट स्वैपाक केल्यावर मोठ्या प्रेमानें तिनें आपल्या पतीकडून भोजन करविलें. आणि मागाहून त्याच्याच उच्छिष्ट अन्नाचें एक दोन घास घेऊन तिनें भांड्याकुंड्यांची वारासार करून ती पतीच्या शय्यास्थानीं आली. तेथें तो शय्येवर पडून गुडगुडीचे झुरके घेत होता. कुसुमच्या हृदयाची या वेळची स्थिती मुक्त भोगी वाचकांना सहजच कळून येणार आहे. प्रेम आणि लज्जा यांच्या ओझ्यानें जणूं भारवल्यामुळेंच कीं काय ती अगदीं जड पायांनीं थबकत थबकत पुढें झाली आणि आपल्या पतीच्या पायगतीं बसून त्याची चरणसेवा करण्यास आरंभ केला. त्या सरसा रामनाथ चिरडीस जाऊन तिच्या अंगावर ओरडून तिला ह्मणाला " पहा, मला सुखानें झोंप घेऊं द्यावयाची असेल तर तूं येथून चालती हो. नाहीं तर मी आतां उठून चालतां होईन— मला नाहीं आपले पाय दाबून घ्यावयाचे. "

**कुसुम**—नाथ आपली चरणसेवा करणें तर माझें कर्तव्यच आहे. हा मी कांहीं आपणावर उपकार करीत नाहीं अथवा त्याबद्दल आपणांपाशीं कांहीं मागावयाचें नाहीं. या अपार संसारांत मला याच चरणांच्या आसरा आहे. ते सोडून मी कोठें जाऊं.

**रामनाथ**—चल नीघ येथून. तुझें कौटाळ मी खूप समजून चुकलों आहें.

**कुसुम**—हाय हाय ! विधात्यानें मला कां अशी अभागी निर्माण

केली कोण जाणे. या जगांत मी ज्यांची ह्मणून ह्मणविली जाते त्यांनींच जर मला अशी दूर लोटिली मला हिडिस फिडिस केलें तर मी जाऊं तरी कोठें ? यावेळीं पृथ्वी दुभंग होईल तर मी खुषीनें तिच्या पोटीं ठाव घेईन. प्राणप्रिया मी व्यर्थ तुह्मांला दोष देते. माझीच पुण्याई संपली. दिवस फिरले, आणि ह्मणूनच ज्यांच्या करितां मी स्वतःच्या जीवाचीही पर्वा केली नाहीं, ज्यांच्या वाचून या त्रैलोक्यांत मला प्रिय वस्तु नाहीं त्यांनांच मी त्यांचे प्राण घेण्यास तयार झालें होतें असें वाटावें हें कशाचें चिन्ह ? कोण चांडाळिणी आपदशा पतीचा प्राण घेण्यास तयार होत असतील त्या असोत. मी तर तशापैकीं नाहीं हें खचित. मी तुमच्या पायाची शपथ वाहून सांगतें कीं मी अगदीं निदोर्षी आहे तुह्मी पाहिजे तर आपल्या हातानें मला कापून टाका. मला दुःख व्हावयाचें नाहीं. मी तुमच्यावरून ओवाळूनच मेलें असें समजेन. परंतु या दोषास्पद वाग्बाणांनीं माझ्या कोमल हृदयाचा भेद करूं नका. जन्मापासून दुःख सोसता सोसता हें माझें हृदय अगदीं जीर्ण झिरझिरीत झालें आहे. त्याच्यानें हीं आपलीं विषसारखीं बोलणीं सहन व्हावयाचीं नाहींत. ”

याप्रमाणें धाय मोकलून बोलत असतां ती अगदीं व्याकूळ होऊन गेली. परंतु पाषाणहृदयी रामनाथाच्या मनावर तिच्या भाषणाचा यत्किंचितूही परिणाम घडला नाहीं. त्याला जें एकदां संशय पिशाचिकेनें घेरिलें होतें ती त्याला त्यास्थळीं क्षणभर देखील राहूं देईना. शेवटीं “होय. होय, मला ठाऊक आहे तूं किती निर्दोषी आहेस ती- ” असें ह्मणत ह्मणत तो तेथून चालता झाला.

झालें. बिचाऱ्या कुसुमची पूर्ण निराशा झाली. आपला पती आपणा समोरून निघून जात असलेला पाहून तिला मूर्च्छा आली. आणि इकडे रामनाथ गोपीनाथाच्या सूचनेप्रमाणें आपल्या संकेतस्थानीं जाऊन पोहोचला.

कुसुम—आई, या संबंधांत तूं मुळीं देखील हट्ट धरूं नको. आईची माया वेडी ह्मणून लोक तुझी स्तुती करितील; पण जाणतेपणी मी आपलें घर सोडून आल्याबद्दल माझ्या वाट्यास निंदाच येणारी आहे.

पुष्कळ सांगितलें तरी आपली मुलगी देखील आपलें ऐकत नाहीं असें पाहून ती ह्मातारी बरीच रागावून चिडल्यासारखी झाली आणि आपलें बोचकें उचलून घेऊन "असली हट्टी पोरगी नव्हती मी कोठें पाहिली. पहा या आपल्या हट्टाचें कसें फळ भोगशील तें. मला एकटीला ना ह्मणतेस तर ही मी चाललें. माझ्या लेखीं आजच तूं मला मेलीस." असें ह्मणत ह्मणत ती तेथून चालती झाली.

कांहीं दूर गेल्यावर ती पुन्हा एकदां मागें परतली. कसें झालें तरी आईचें आंतडें तें. तिनें आपल्या पिशवींतून दोन रुपये काढून कुसुमचे स्वाधीन केलें आणि ह्मटलें "मी जातांना नावाड्यांना तुझा समाचार घेण्याविषयीं सांगून ठेवितें. ते मधुन मधुन तुला भेटत जातील. आणि तुलाच जर तिकडे यावेसें वाटलें तर मात्र येण्याचा संकोच करूं नकोस."

कुसुमनें ते रुपये देखील ठेऊन घेण्याचें नाकारिलें. तेव्हां मात्र ती ह्मातारी अगदीं निरुपाय झाल्यासारखी होऊन चरफडत तेथून चालती झाली.

याच वेळीं आपण आतां दामिनीच्या अंतःकरणाची काय स्थिति झाली आहे तें पाहूं. हरनाथाच्या पश्चात् घरांत जेव्हां कोणीच नव्हतें तेव्हां तिला मनसोक्त धुडगूज घालण्यास चांगलाच अवसर मिळे. परंतु आपल्या मातेसहवर्तमान कुसुम घरांत येऊन राहिल्यापासून तिच्या स्वैरतेंत हें मोठेंच विघ्न येऊन पडलें होतें. तथापि या दोघींचा आपल्या घरांतून लवकरच उठाव होईल अशी तिला आजपर्यंत आशा होती. परंतु ती तिची आशा केवळ निष्फळ झाली. आई गेली तरी कुसुम घरांत राहिलीच. मग आपल्या मार्गांतील हा जबरदस्त कांटा कसा दूर करावा या विचारास ती लागली. कुसुमची व्याधि

केव्हां एकदां टळेल असें तिला होऊन गेलें. पुष्कळ विचारांतीं तिनें एक रामबाण युक्ति काढिली आणि ती आपल्या प्रियतमास कळविली. तिच्या विचारास त्याची संमति मिळाली. तो तिला ह्मणाला " रामनाथ घरीं येतांच त्याला एकदम बोलून बसूं नको. होईल तितकें करून अशी लांब रुंद प्रस्तावनेची भिंत उभार कीं, तिच्या आधारावर पुढला व्यूह डळमळणार नाहीं; पहातों कशी रचना करतेस ती. तुझ्या अंगची चतुराई पहाण्याचा हाच प्रसंग आहे. "

वाचकहो, याप्रमाणें त्या जारजारिणींनीं खलबत करून बिचाऱ्या कुसुमबद्दल रामनाथाचे मनांत विपरीत भाव भरवून देण्याचा निश्चय केला.

---

## भाग नववा.

हरलाल सावाला आपला मुलगा नवीनचंद्र याच्या दुर्वर्तनाची खबर लागली. त्यावर त्यानें पाळत राखून त्याची चांगली कानउघाडणी केली व गोपीनाथाच्या संगतीला न लागण्याविषयीं ताकीद दिली. याची पूर्ण खात्री होऊन चुकली होती कीं, आपला मुलगा गोपीनाथाच्याच संगतीनें बिघडला. मग त्या बाबतींत त्यानें गोपीनाथाला आपले घरीं येण्याची सक्त मनाई केली. अशा रीतीनें नवीनचंद्ररूपी सावज हातचें गेल्यामुळें आमचे गोपीनाथ आणि रामनाथ पुनरपि हात चोळीत बसले. त्यांनीं आपले स्वतःचे पैसे तर कधींच फुंकून टाकिले होते. त्यावर नवीनचंद्राच्या संपत्तिचंद्रिकेंत हे दोघे गुलहौसी मौजा मारीत होते. आतां तोही हातचा गमावल्यामुळें त्यांना पुन्हां फाके पडूं लागले. द्रव्यावांचून त्यांची चंद्री व्यापिली. त्यांना आपलेसमोर अंधार भासूं लागला. त्यावेळीं गोपीनाथ ह्मणाला " भाई राम आतां पुढें आपली गति काय होणार ? आपली तर अगदीं चकभूल होऊन गेली आहे. काय करावें ?

कांहींएक सुचत नाहीं. सारा गांव धुंडला पण आतां एक चिमणी देखील हातीं लागेल तर शपथ. "

**रामनाथ**—करायचें काय ? कोठून तरी द्रव्यसंपादन हें झालेंच पाहिजे. मग या मार्गानें साधत नसेल तर दुसरा मार्ग पाहिला !

**गोपीनाथ**—तुमची उमेद अजून जोरावर दिसते; पण मला कांहीं पुढें ठीक चिन्ह दिसत नाहीं. आज या ठिकाणीं सुखानें गप्पा ठोकीत आहोंत पण उद्यां दुपारची चूल कशी चालेल तें कांहीं कळत नाहीं.

**रामनाथ**—तर काय आतां चोऱ्या करायला सांगतोस; तेवढें मात्र राहिलें आहे. आजपर्यंत आपण कसें झालें तरी अब्रूनें दिवस काढिले आहेत. लोकांनीं आपणास चैनी ह्मटलें पण चोर ह्मटलें नाहीं; गुलहौसी ह्मटलें पण शिंदळ ह्मटलें नाहीं आणि पुष्कळदां फटकळ ह्मटलें असेल पण चहाडखोर ह्मटलें नाहीं.

**गोपीनाथ**—तें सगळें ब्रह्मज्ञान मला समजतें पण ह्मण आहेना.

**दोहरा–कौडीके इस जहानमें नकशी नगीन है ।**
**कौडी न हो तो कौडीके फिर तीन तीन है ॥**

**रामनाथ**—ह्मणूनच ह्मणतो कीं, द्रव्याजनासाठीं आपण कांहीं तरी उद्योग करावा.

**गोपीनाथ**—तूं आतां काय करण्याचें योजिलें आहेस ?

**रामनाथ**—मी तर उद्यांच कलकत्त्यास जाणार; तेथें माझा मामा एका महाजन बनीयाच्या कोठीवर नोकर आहे तेथेंच मीही राहीन.

**गोपीनाथ**—कलकत्यांत तुझा मामा कोठें रहातो ?

**रामनाथ**—हठखोलींत बाबू---सावाची एक आडत आहे. ती फार मोठी गादी आहे. एकवेळ तेथें जाऊन आपलेंही नशीब भिडवावें असें मनांत आहे.

याप्रमाणें बराच वेळपर्यंत त्या दोघांचें संभाषण झाल्यावर गोपीनाथ आपल्या घरीं गेला आणि रामनाथालाही आपल्या घराची शुद्ध आली.

आज रामनाथ बरोबर दीड महिन्यांनीं स्वतःच्या घरांत पाऊल ठेवीत आहे.

रामनाथ घरीं आलेला पाहून दामिनीच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. ज्याप्रमाणें वर्षाकाळांतील नदी दुथड्या भरून वाहते त्याप्रमाणें दामिनीची आनंदनदी दुथड्या भरून चालली होती. आपल्या मनांत ठेविलेलें कालकूट विष आपल्या भावाच्या कानांत केव्हां एकदां ओकेन असें तिला झालें होतें. तशांतून गयारामाची तिला एकदम बोलूं नकोस ह्मणून सूचना होती. पण इकडे दामिनीचें पोट जणूं त्या गोष्टीनें फुगत चाललें आणि त्याला केव्हां एकदां हलकें करीन असें तिला होऊन गेलें. तिनें आळेबळे कसा तरी दिवस लोटिला. पण रात्र होतांच तिच्या पोटांत पुन्हां त्या कालकूट विषाचें वेट वळूं लागले. तेव्हां तिनें आपल्या भावास हातीं धरून एकीकडे नेलें आणि पुढें लिहिल्याप्रमाणें भाषणास सुरवात केली:—

**दामिनी**—भाईराजा, आज मला तुझ्याशीं कांहीं बोलावयाचें आहे. पण तूं रागावशील ह्मणून मला भीती वाटते. तूं जर रागावणार नाहींस तर बोलते. नाहीं तर—

**रामनाथ**—अशी कोणची रागावण्यासारखी गोष्ट आहे ह्मणून तूं मला इतकी बांधून घेतेस. सांगना काय सांगायचें तें.

**दामिनी**—सांगायचें इतकेंच कीं, आतां तूं हें लक्षण सोडून दे. गांवभर तुझी निंदा होत आहे. बायका पुरुष सर्व लोक तुझी छीथुः करीत आहेत. पण तें तुझ्या गांवींही नाहीं. भैया, असें केल्यानें दिवस कसे निभणार! आतां तूं कांहीं लहान नाहींस. देवाचें देणें असतें तर तुझीं दोन लेकरें देखील तुझ्या पुढें खेळतीं. अतां तर तुला असें वागलें पाहिजे कीं, जेणेंकरून दोन पैसे घरांत येऊन घरप्रपंच चालावा. आणि लोकांनीं बरें ह्मणावें.

**रामनाथ**—याबद्दलचा विचार मी पूर्वींच करून चुकलों आहें.

आतां तूं कांहीं चिंता करूं नकोस. एवढेंचना तुझें ह्मणणें होतें कां आणखी कांहीं सांगणार होतीस ?

**दामिनी**— सांगावयाचें आहे ह्मणून तर एकीकडे तुला बोलविलें.

**रामनाथ**—मग सांगत कां नाहींस !

**दामिनी**—काय सांगूं मी आपलें डोंबल. पण सांगितल्यावांचूनही गत्यंतर नाहीं.

**रामनाथ**—मग त्यांत इतकें अडखळण्यासारखें तें काय आहे ! काय सांगायचें असेल तें चटपट सांग.

**दामिनी**—सांगणार तर आहेच; मला काय कोणाचें भय आहे ?पण ह्मणतात नाहीं तशातली गत. " कहूं तो मा मारी जाय, न कहूं तो बाप कुत्ता खाय " अशी माझी अवस्था झाली आहे.

**रामनाथ**—तुझ्या या आढेवेढे घेण्यानें तर माझा जीव अगदीं उबला. मी जातों कसा ! कांहीं सांगे न सवरे.

**दामिनी**—अरे, बस बस; सांगतेंना. सांगूं नाहींतर काय करूं ? कां आपल्या बापदादांच्या कुळाला कलंक लावून घेऊं ? मागून आणखी मला विधवेला दोष देण्याला तूंच तयार होशील. माझे तर ताळवेचे केस पिकले. बालपणांतच दैवाला आग आगली पण तुला काय सांगूं उगीच जास्ती कांहीं बोलत नाहीं; कां कीं बायकोच्या अडीच घटका चितेला देखील दुःसह होत असतात. कोणी मजकडे बोट देखील दाखविलें नाहीं. मी अशी जगांत आहे कीं नाहीं अशी राहिलें. पण ही कालची पोरगी तिचे ढंग तर पहा. धन्य आहे कालियुगाची !

**रामनाथ**—तूं इतकी काय भिते आहेस. तिनें काय केलें तें उघड उघड कां नाहीं सांगत ?

**दामिनी**—भैय्या, काय सांगूं ! ही माझी भावजय निव्वळ आमच्या कुलाला डाग लावायाला आली आहे. माझ्यानें कांहीं आतां हें सोसवत नाहीं. आजपर्यंत सर्व गिळून बसलें होतें. पण आतां तुला सांगतें तूं तिला

मुकाट्यानें माहेरीं पोचीव नाहींतर बेलाशक कुठें तरी अरण्यांत नेऊन सोड.

**रामनाथ**—मी तर तिचें कधींच नांव सोडिलें आहे तुला नाहीं कां माहीत ! पण झालें काय तें तर तुझ्या मुखावाटे बाहेर पडूं दे.

**दामिनी**—तिला आपला मुकाट्यानें कोठें तरी नेऊन पोचीव हें तर सांगतेच आहे आणखी जास्त बोलून काय तिचा प्राण घेववूं ? तुझा राग मला माहीत आहे.

त्यावर **रामनाथ** कांहींसा रागावून ह्मणाला " ताई, तूं तर माझा प्राण कंठास आणिलास. तिनें काय केलें तें साफ साफ कां नाहीं सांगत. त्याला एवढा शिष्टाचार आणि आढेवेढे कशाला पाहिजेत."

आपलें भाषण मन लावून ऐकण्याविषयीं **रामनाथाची** पुरेशी उत्सुकता वाढविल्यानंतर **दामिनी** गंभीर मुद्रा धारण करून त्यास ह्मणाली " तुला आठवतच असेल आज तीन चार दिवस झाले एके दिवशीं रात्रीं फारच मोठें वादळ सुटलें होतें. एक तर अंधेरी रात्र आणि त्यांत दुसरें वादळाचें काहूर ! मग काय विचारितां ? एका हातानें दुसरा हात चाचपून पहावा लागत होता. मी मनांत ह्मटलें आज प्रळय बिळय तर नाहींना होत. मग मी झटपट खाणें पिणें उरकून वहिनीस ह्मटलें ' आपण दोघी आज एकाच खोलींत निजूं. त्यावर पहिल्यांदा तर तिनें माझें बोलणें ऐकलें न ऐकलेंसेंच केलें. मला कोडगीला लाज नाहीं मी पुन्हा विचारिलें तेव्हां ती ह्मणाली " मी जिथें निजते तिथेंच मला चांगली झोंप येते. नव्या जागेंत माझी झोपमोड होईल. " मी ह्मटलें " आज फार भयंकर गडगडाट होतो आहे, विजा चमकताहेत, अंधार तर इतका पडला आहे कीं कोणी येऊन डोळ्यांत बोट घातलें तरी देखील दिसावयाचें नाहीं. मला देखील आज एकटीला निजावयाला भय वाटत आहे आणि तूं तर एवढीशी पोर. तुझ्यानें कसें एकटें निजवेल ? " ती ह्मणाली " मला अलीकडे एकटें निजण्याची संवयच पडून गेली आहे. " मी ह्मटलें " ह्मणून काय झालें. निदान आजच्या-

सारख्या दिवशीं तरी तूं एकटी निजूं नकोस. माझ्याजवळ ये. " त्यावर ती चिरडीस येऊन ह्मणाली ' होऊं दे माझें काय व्हावयाचें असेल तें. तुझी तर जशी माझी पाठच पुरविली आहे. " हें तिचें बोलणें ऐकून मी आपली मुकाट्यानें माझ्या खोलींत जाऊन निजलें. मला थोडासा डोळा लागला असेल नसेल इतक्यांत घो घो करीत वाऱ्यानें उघडीं असलेलीं दारें दणादण आपटण्यास सुरुवात झाली. क्षणोक्षणीं विजांचा चमचमाट होतच होता आणि पावसाच्या सरीवर सरी कोसळत होत्या. माझा जीव वेडा. माझ्यानें राहवेना. मी उठून धांवत धांवत अंगण ओलांडून तिच्या खोलीपाशीं गेलें. आणि वहिनी वहिनी, दार उघड पाहूं असें ह्मणून कितीकदां तरी हाका मारल्या, दार हालविलें, खडाखडा कडी वाजविली, पुन्हां हाका मारल्या. पण आंतून उत्तर येईल तर शपथ. बाहेर पावसाचे शिंतोड्यांनीं माझें सारें अंग भिजून तर झालें. माझ्या अंगाचा अगदीं थरकाप झाला. त्या दिवसापासून जी माझ्या अंगांत थंडी शिरली आहे ती अजून देखील नाहींशी होत नाहीं. मी जेव्हां पुष्कळच कंठशोष केला तेव्हां कोठें तिनें हळूचसें उठून दरवाजा उघडिला. मी ह्मटलें " माझें लुगडें भिजून अगदीं चिंब झालें आहे यासाठीं भैयाचें एखादें धोतर असलें तर दे लौकर ह्मणजे मी तें वेढून घेऊन हें ओलें सोडितें. तुझी झोप तरी कसली कुंभकर्णी आहे कोण जाणे. हाका मारतां मारतां माझ्या घशाला कोरड पडली. त्यावर तिनें खोकून खाकरून बऱ्याच वेळानें ह्मटलें " या अशा अलीकडे मी शोधून देतें एखादें असलें तर. " मी जशी आंत गेलें तसा माझ्या मागून कोणीतरी निघून गेल्याची मला चाहूल लागली. माझ्या मागून निघून कोणीतरी मनुष्य पळून गेला खास. तितक्यांत माझ्या सुदैवानें किंवा तिच्या दुर्दैवानें ह्मणा वीज चकमकली. त्या उजेडांत तर स्पष्टपणें एक मनुष्य निघून गेलेला मीं पाहिला. त्यावेळीं माझ्या अंगाचा कसा अगदीं थरकाप होऊन गेला. मी तिला ह्मटलें " वहिनी आतां कोण मनुष्य पळाला. " त्यावर ती ह्मणाली " कोण मनुष्य पळणार !

तुह्मी कोणाला बरोबर घेऊन आला होता कीं काय ? माझी अशी थट्टा करूं नका. मी आपली कशी तरी जीव मुठींत घेऊन रात्र काढिते. मला उगीच असली रिकामी दटावणी दाखवूं नका. एक तर मुद्दाम येथें येऊन माझी झोपमोड केलीत आणि वरती ह्मणतां कीं, येथून कोण पळालें. मेला माझ्या मागें जसा वनवास लागला आहे. यमाला मी दिसतच कां नाहीं ? इथें अशा अभाग्याच्या घरीं येऊन पडलें कीं सारा जन्म दुःख भोगतां भोगतां गेला. आग लागेना एकदांची माझ्या दैवाला."

असें आणखीही पुष्कळ आपल्याशींच गुडबुड गुडबुड करीत होती. मी तर तिच्या खोलींत जाऊन चांगलीच पस्तावांत पडलें होतें. पण मग तिचें तोंड जेव्हां बंद होईना तेव्हां " एवढ्या अपरात्रीं आतां कोणी आळी जागवावी " असें ह्मणत मी आपल्या खोलींत परत येऊन कोरडें वस्त्र नेसून निजलें. झालें. मला जें काय सांगायचें होतें तें मी तुला सांगितलें. ती कांहीं कोणी माझी वैरीण नाहीं, कित्येक देवांना नवस केले असतील, किती खटपटी कराव्या लागल्या असतील तें माझें मीच जाणे. बाबूंना सांगून तुझें लग्न करून दिलें. पुढें त्यांच्या मागें लागून मीच होऊन तिला इकडे घेऊन येण्यासाठीं तिच्या माहेरीं तुला पाठविलें. पण मला काय असें माहीत कीं आमच्या वहिनी-बाई अशा गुणी निघतील ? आतां तुझ्या मर्जीस येईल तसें कर; पण पहा मी तुझ्या पुढें पदर पसरून एवढें मागणें मागते कीं, तूं माझें नांव घेऊं नकोस. नाहीं तर तूं एकदां आज निघून गेलास ह्मणजे मग पुन्हां केव्हां दृष्टीस पडशील तें कांहीं सांगवत नाहीं. इकडे ती मात्र माझ्या ताळवेला एक केंस राहूं द्यावयाची नाहीं. तिच्या बरोबर अष्टौप्रहर वर्दळ घालीत बसण्याला माझ्या अंगीं कांहीं सामर्थ्य नाहीं. शिवाय तुझ्या काना-पर्यंत तरी कोणकोणत्या गोष्टी ह्मणून आणावयाच्या. माझ्या स्वभावाला तर असें हिकडचें तिकडे करावयाला नको. आज हें तरी अशा करितां तुला सांगितलें कीं पुढें मागें तूंच मला कां सांगितलें नाहींस ह्मणून तुं मला फाड फाडून खातास."

दामिनीच्या तोंडचें तें विषदिग्ध भाषण श्रवण करतांच रामनाथाचें अगदीं देहभान नाहींसें झालें. त्या तिडकीसरसा तो जो बेथून उठला तो धांवत धांवतच ज्या ठिकाणीं बिचारी निरपराधी कुसुम स्वस्थपणें निद्रा-सुखाचा उपभोग घेत होती त्या ठिकाणीं आला. आणि त्या अनिवार क्रोधभरांत तो त्या निर्दोष अबलेवर चवताळलेल्या वाघासारखा तुटून पडला. त्या दुष्टानें तिची वेणी धरून तिला चौपाईवरून खालीं ओढिलें आणि लाथाबुक्यांनीं बेसुमार मारण्यास सुरुवात केली. हातानें मारण्याचें काम चालूं असतां तोंडानें तो तिला ह्मणाला " जारिणी, मी तुला पहि-ल्यापासूनच जाणून होतो. तुझें लक्षण मला पूर्वीच कळून चुकलें होतें. तूंच ना मला आपल्या भावांकडून ठार करण्याचा विचार केला होतास ? आणि येथें आल्यावर कुलटा मला गोड गोड भाषणांनीं भुलवावयास पहात होती ! मी तर आज तुझें रक्त पिणार. घे आपल्या कर्मांचीं फळें भोग. आतां तुझा प्राण घेतल्यावांचून सोडीत नाहीं. मग त्या पायीं फांशीं गेलों तरी बेहत्तर आहे. इतके दिवस मी तुझ्या पाळ-तीवरच होतो. तुला वाटलें असेल, कीं तूं अगदीं पाण्याच्या बुडाशीं जाऊन पाणी पीत आहेस तें काय लोकांना कळणार. पण कुलकलंके, पाप कां कोठें लपून रहात असतें. "

अशा रीतीनें एकीकडे हस्तपादप्रहारांनीं आणि एकीकडे वाक्प्रहा-रांनीं ताडन करितां करितां त्याचे हातपाय दमले व तोंडही दुखून आलें. परंतु त्याच्या मनाचें समाधान ह्मणून झालें नाहीं. त्याला वाटलें कीं हिला शंभर देह असते तरी बरें झालें असतें हिचा हा एकटा देह हिच्या अपराधाच्या शिक्षेला कुचकामाचा. शेवटीं त्यानें एक जळाऊ लाकूड घेऊन त्यानें त्या बिचारीस बाथडण्यास सुरवात केली. त्या सरसी कुसुमला मूर्च्छना आली. इकडे दामिनी आडून तो सर्व प्रकार पहातच होती पण भामा जरा पुढें झाली असेल तर शपथ. कुसुमची अखेरची किंकाळी ऐकून पांचचार शेजारीपाजारीही उठून तेथें आले. परंतु

रामनाथानें त्यांना एक पाऊलही पुढें सरकूं दिलें नाहीं. रामनाथाचा स्वभाव त्यांना पूर्वीपासूनच माहीत असल्यामुळें त्यांचा अगदीं नाइलाज झाला. तेव्हां उगीच धर्म करितां कर्म उभें रहावयाचें असें ह्मणत ते लोकही तेथून चालते झाले.

कुसुमला मूर्छा आलेली पाहून मात्र दामिनी मनांत चरकली. रामनाथाची वृत्ति तर बेफाम होऊन गेल्यामुळें त्याला आपल्या हातून घडत असलेल्या स्त्रीहत्येचें भानच नव्हतें. पण दामिनी मात्र त्यावेळीं बरीच घाबरली आणि मोठ्या कांधावानें पुढें होऊन त्यास ह्मणाली " अरे चांडाळा, तिचाका पुरता प्राण घेतोस कीं काय ? कठीण बाबा तुझा राग ! चल दूर हो. व्हायचें तें झालें आतां असा बाजार माजविण्यांत काय अर्थ आहे. आतां जर तिच्या अंगावर हात टाकशील तर माझ्या रक्ताची शपथ. चल नीघ येथून. मी आपली अंगणांत बसलें होतें मला काय माहीत तुझ्या डोक्यावर आज विवशी बसून आली आहे ह्मणून. इकडे धांवत येतां येतां वाटेंत उखळीची ठेंच लागून मी तोंडघशीं देखील पडलें. हें पहा पाहिजेल तर डोक्याला केवढें टेंगूळ आलें आहे. "

दामिनीच्या भाषणानें रामनाथ बराच वरमून त्यानें आपला हात आखडला. इकडे दामिनी कुसुमजवळ बसली. बिचारी कुसुम यावेळीं मृतप्राय बेशुद्ध झाली होती. तिच्या अंगांतून रक्ताच्या धारा वहात होत्या. आणि कित्येक जागीं अंग सुजत चाललें होतें. दामिनीनें तिला इकडे तिकडें हालवून पाहिलें. तेव्हां रामनाथ ह्मणाला " अगे, हें काय तूं करतेस ती मेली नाहीं. तिला ठार मारायला मला वेड लागलें आहे कीं काय ? येईल क्षणाभरानें शुद्धीवर. बरें मला आतां येथें रहावयाचें नाहीं. मी निघालों कलकत्त्याला जावयाला ही जेव्हां शुद्धीवर येईल तेव्हां हिला बेलाशक घरांतून हाकवून दे. असली कुळबुडवी माझ्या घरांत नको. "

दामिनीनें विचारिलें " कलकत्त्यास कशाला जातोस. "

**रामनाथ**—जातो तेथें कांहीं रोजगार धंदा पहावयाला. या गांवांत राहून कांहीं आतां निभाव लागावयाचा नाहीं.

**दामिनी**—एकटाच जाणार कीं आणखी कोणी सोबतीला आहे.

**रामनाथ**—बरोबर कोणी नाहीं मी एकटाच जाणार;

**दामिनी**—एकटा जाऊन तेथें काय करणार ? कोणी साथीदार बरोबर असता ह्मणजे बरें झालें असतें.

**रामनाथ**—तेथें मामा आहेत तर खरें. त्यांचेकडे गेलो ह्मणजे सर्व कांहीं जमेल.

**दामिनी**—भैया तूं कांहीं कोणाच्या सांगण्यांत तर नाहींसच कांहीं झालें तरी तूं आपला हट्ट पुरविणार. पण तिकडे गेल्यावर वरचेवर तुझ्या खुशालीची खबर तरी कळवीत जा. नाहीं तर एकदां तिकडे गेलास ह्मणजे तिकडचाच होशील. आणि ह्रिकडे माझा जीव मात्र टांगणीस लागेल.

याप्रमाणें हकीकत घडल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळींच रामनाथ कलकत्त्याला निघून गेला. त्यावेळीं त्याचे जवळ फक्त तीन रुपये होते. तेवढेंच घेऊन त्यानें बसंतपुरची हद्द सोडिली. मागें स्वर्ग देवता कुसुम आणि स्मशान देवता दामिनी यांची काय हकीकत घडली ती वाचकांस पुढील भागांत कळेल. वाचकहो, तुह्मांला या जगांत सत्याचा जय झालेला पहावयाचा आहे काय ? तर मग पुढील भाग वाचीपर्यंत धीर धरा.

---

## भाग दहावा

खरें आहे. " सगळेच दिवस कांहीं सारखे जात नाहींत " असें ह्मणतात तें अगदीं अक्षरशः खरें आहे. या ईश्वरनिर्मित सृष्टींत कोणतीही अवस्था सतत एकसारखी राहिलेली आढळांत येत नाहीं. जो प्राणी एके वेळीं सिंहासनावर बसून छत्रचामरांचा उपभोग घेत असतो, मोठेमोठे धनी, मानी आणि ज्ञानी ज्याच्या चित्ताचा रोख न्याहाळीत असतात, मोठे मोठे पंडित आणि गुणी लोक ज्याच्या प्रसन्नतेसाठीं स्वतःच्या मानापमानाकडे यत्किंचित् देखील लक्ष देत नाहींत. हजारों दीन दुःखी आणि भणंग भिकारी ज्याच्या द्वारावर नित्य घिरट्या घालीत असतात, जो आपणाला या संसारांत अत्यंत धन्य समजून इतराना तुच्छ समजत असतो तोच सिंहासनाधिपति राजा दुसरे वेळीं केवळ एक कुचैल ( रकटें ) पांघरून घांसभर अन्नासाठीं दारोदार फिरत असलेला दृष्टीस पडतो. याचें उलट ज्याच्या अंगावर पूर्वी बोटभर चिंधी दिसावयाची नाहीं अथवा वेळचेवेळीं ज्याच्या पोटांत कधीं धान्याचा कणही जावयाचा नाहीं ज्याला आपण सात जन्म तपश्चर्या करूनही श्रीमंत होण्याची आशा नसावयाची तोच मनुष्य प्रभूचा कृपालव होताच हजारांचा पोशिंदा बनून या भूलोकींच नंदनवनाचा उपभोग घेऊं लागतो. तात्पर्य रंकाचा राव आणि रावाचा रंक असें ह्मणतात त्या प्रकारची घडामोड या जगांत सदोदित दृष्टीस पडत असते.

निर्मल चंद्राचें चांदणें पडून सृष्टि प्रसन्न भासत आहे. हळूहळू शितल वायूची झुळूक येऊन शरीरावर सुख रोमांच उभवीत आहे. आणि चकोर आणि चकोरी चंद्रमाकडे टक लावून या सर्व आनंदपूर्ण परिस्थितीचा उपभोग घेत आहेत. अखिल सृष्टि गंभीर आणि शांत भासत आहे. इतक्यांत एकाएकी घो घो शब्द करीत कोणीकडून काहूर उठलें

पहा. एकाएकी चंद्राच्या आड काळेकुट्ट ढग येऊन चहूकडे अंधार पडला. दशदिशा धुळीनें व्यापून गेल्या. लोक घाबरले. वरचेवर मेघांचा गडगडाट आणि विजांचा चमचमाट होऊं लागला आणि शेवटीं तर मुसळधार पाऊस कोसळण्यास सुरुवात झाली. पहिल्या चंद्रप्रकाशांतील रमणीय सृष्टिसौंदर्याचा लेशही कोठें शिल्लक राहिला नाहीं. ह्मणून ह्मणावें लागते कीं " सगळेच दिवस कांहीं सारखे जात नाहींत. "

गयाराम आणि दामिनी ज्या सुखस्वप्नांचा उपभोग घेत होती तीं सुखस्वप्नें अचानक निरस्त होऊन गेलीं. दामिनीनें कुसुमला घराबाहेर घालवून गयारामाच्या संगतींत निर्धास्तपणें काळ घालविण्याची इच्छा केली होती ती तिची इच्छा मनांतल्या मनांतच राहिली. रामनाथ कलकत्त्यास गेल्यानंतर सुमारे आठ दहा दिवसांनींच दामिनीचें संपूर्ण शरीर व्याधिग्रस्त झालें. त्यामुळें ती इतकी आजारी झाली कीं तिच्या अंगीं उठण्या बसण्याचें देखील सामर्थ्य राहिलें नाहीं. तें पाहून गयारामानें सत्वर एका वैद्यास बोलावून आणिलें. त्यानें तिची उत्तम प्रकारें चिकित्सा केली. दिवसांतून तीन तीन चार चार वेळ येऊन तो आपल्या कल्पनेप्रमाणें आलटून पालटून औषधें देत होता. तथापि दामिनीचा आजार कमी न होता उलट वाढतच चालला .ती एकसारखी रात्रंदिवस कण्हत आणि ओरडत पडे. तिच्या शरीरास होत असलेल्या यातना पाहून गयारामास फारच वाईट वाटत होतें. परंतु तो औषधोपचाराशिवाय जास्त काय करणार. त्यानें एक सोडून दहा वैद्य आणिले परंतु कांहींएक उपयोग झाला नाहीं. अशा रीतीनें तीन चार दिवस लोटले सर्व वैद्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं रोग असाध्य होत चालला हिची आतां जगण्याची आशा नाहीं. चांगल्या पढिक, अनुभवशीर आणि विश्वासाच्या वैद्यांनींही हात टेकलेले पाहून गयारामाचें चित्त उदास होऊन गेलें. तो एकांतीं बसून रडूं लागला. इकडे दामिनीची वास्तपुस्त करण्याला गयारामावांचून दुसरें

कोणीच नव्हतें. काकीं तिच्या समाचारास दुसरें कोण येणार ? एक कुसुम काय ती असावयाची परंतु रामनाथाच्या बेदम मारानें ती इतकी हलक झाली होती कीं तिच्यानें अजून जागचें हलवत देखील नव्हतें.

गयाराम मात्र अगदीं ईश्वर स्मरून आपल्या शेजारणीची सेवा चाकरी करीत होता. तो तिच्या जवळ बसून वारंवार धीर देई आणि तिची शुश्रूषा करी. परंतु तिला झालेला रोग दिवसा दुप्पट आणि रात्रीं चौपट या प्रमाणानें वाढत चालला. तिचें सर्व शरीर फुलल्यासारखें होऊन त्यांतून जागोजाग पू वाहूं लागला. त्यामुळें तिच्या अंथरुणापांघरुणास दुर्गंधि येऊं लागली. तिच्याजवळ जाण्याची देखील सोय राहिली नाहीं. तिला होत असलेल्या वेदनानीं ती अशी भयंकर रीतीनें किंकाळ्या फोडी कीं त्या ऐकतांच एखाद्याचे पोटांत धडकी भरावी. होता होता ती इतकी अशक्त झाली कीं तिच्यानें पुढें मुखावाटे शब्दही काढवेना. तिची वाचा बसली. गयाराम तिच्या उशाशीं बसून एकनिष्ठपणें तिची चाकरी करीत होता. जशी तशी रात्र संपत आली. मंद मंद आणि सुगंधित वायूची झुळुक वाहूं लागली. आपआपल्या कोठ्यांत बसून आनंदानें रात्र घालविलेले पक्षी चिंव चिंव शब्द करूं लागले. पूर्वेकडे उजेड दिसूं लागला आणि पहाता पहाता तेथील आकाश आरक्तवर्ण झालें. विकसित पुष्पांना डोलवीत आणि कोमल वृक्ष शाखांना हलवीत येणाऱ्या वायूनें गयारामाच्या अंगावर येऊन अशा रीतीनें आपला हात फिरविला कीं त्याला इच्छा नसतांही झोपेनें अगदीं घेरिलें. मग निरुपाय होऊन तो तेथेंच जरासा कलंडला. थोड्याशा वेळानें " मला पाणी पाहिजे असा मंद स्वर त्याचे कानीं आला. त्या सरसा गयाराम चपापून जागा होऊन ' होय देतो ' असें ह्मणून डोळे चोळीत चोळीत पाणी घेऊन आला. त्यानें तिच्या तोंडांत थोडेसें पाणी घातलें. दामिनीनें आणिक कांहीं बोलावें अशी त्याची इच्छा होती. परंतु तिनें फक्त त्याचेकडे डोळे उघडून पाहिलें मात्र

त्यावेळची तिची दृष्टि कांहीं चमत्कारिक तऱ्हेची होती. ती पाहून आतां हिचा आयुष्याचा दिवा लवकरच मालवणार अशी गयारामाची खात्री झाली. त्यानें तिला निजल्या जागेवरून उचलून अंगणांत आणिलें. यावेळीं कुसुमही खुरडत खुरडत येऊन तिच्या जवळ बसली. तिला पहातांच दामिनीच्या नेत्रांतून दोन चार अश्रु बिंदु गळून पडले. त्या अंतकाळीं तिच्या मनांतून कुसुमशीं कांहीं बोलावयाचें होतें असें दिसलें. पण त्याचा कांहींएक उपयोग नव्हता. तिची वाचा बसून फार वेळ झाला होता. झालें. पहातां पहातां तें गयारामाचें प्रेमपात्र पंचत्वाप्रत पाऊन भूमीवर पालथें पडलें. तें पाहून गयारामास क्षणमात्र अतोनात दुःख झालें, परंतु असल्या पापी दुर्जनांचें प्रेम अथवा विरहदुःख कांहीं अघटितच असतें. वाचकहो, दामिनीच्या वियोगानें दुःखित झालेल्या गयारामाच्या मनांत त्याचक्षणीं नवीन पापाची वासना उत्पन्न झाली आणि दामिनीच्या विरहव्यथेपेक्षां कुसुमच्या प्राप्तीची व्यथा त्याला अधिक पीडा देऊं लागली. दुर्दैवी कुसुम दामिनीच्या अंतसमयीं तिचा समाचार घ्यावा ह्मणून आली तों ती स्वतःच एका नवीन संकटाच्या भोवऱ्यांत सांपडली.

---

## भाग अकरावा.

एक तर हातांत पैसा नाहीं, दुसरें रेलल्वे स्टेशन दहा बारा कोसावर ह्मणून रामनाथानें पायींच कलकत्त्यास जाण्याचा विचार केला.

यापूर्वी रामनाथ कलकत्त्याला पायीं कधीं गेला नव्हता. परंतु मामाबरोबर नावेंतून दोनवेळा तो कलकत्त्याला गेला होता. त्याच्या गांवाहून कलकत्त्याला जाण्याला सरळ मार्ग नव्हता ह्मणून प्रवासांत त्याला फार श्रम पडले. कोणच्या वाटेनें गेलें असतां सुगम होईल हें त्याला ठाऊक नव्हतें. कारण, कलकत्त्याचा रस्ता तीन दिवसांचा असून मध्यें

अनेक फुटवाटा होत्या. सारांश, कोणाला न विचारतां सवरतां आपल्याच अकलेप्रमाणें जी वाट सुचेल त्या मार्गानें तो जात होता. कलकत्ता दक्षिण दिशेस आहे हें त्याला ठाऊक होतें.

रामनाथानें गंगाकिनाऱ्याचा मार्ग स्वीकारला. दिवसभर गंगेच्या कांठा कांठानें जाऊन तो सूर्यास्ताच्या सुमारास एका वऱ्हाट्याच्या जागीं पोहोंचला. तेथें बरेच अडते लोक रहात होते. त्या अडत्यांपैकीं दोन चार सोडून बाकीचे वैश्य जातीचे होते. रामनाथ तेथेंच एके ठिकाणीं उतरून कांहीं खाऊन पिऊन तंबाखू ओढीत गप्पा गोष्टी करीत बसला. बोलतां बोलतां त्याला कळलें कीं, आजकाल कलकत्त्यांत तंबाखूचा भाव फार चढला आहे. अगदीं कमी दर्जाची तंबाखूही सात रुपये मण विकत होती. चांगल्या तंबाखूस दर मणी बारा रुपये पडत. तेथील अडते लोक ह्मणत होते कीं, जो कोणी तंबाखू कलकत्त्याला आणील तर आज त्याचें जन्माचें कल्याण होईल.

प्रातःकाल होताच रामनाथ निघाला. जरा लांब जाऊन पाहतो तों एका घाटावर मोठमोठ्या बारा नावा लादलेल्या दिसल्या. रामनाथानें नावाड्यास विचारिलें " भाई, नांवावर काय माल आहे ?"

**नावाडी**—तंबाखू.

**रामनाथ**—तंबाखू कोठली आहे ?

**नावाडी**—दिनाजपुरची.

**रामनाथ**—कोठें जाणार ?

**नावाडी**—कलकत्ता.

**रामनाथ**—महाजनाचें दुकान कोठें आहे !

**नावाडी**—दिनाजपुरास.

**रामनाथ**—कलकत्त्यास कोणा अडत्याचे दुकानीं जावयाची आहे ? अथवा तुमच्या महाजनाचें तेथें दुकान आहे.

**नावाडी**—दुकान वगैरे कांहीं नाहीं. जो कोणी प्रथम भाव करील त्याचा सौदा होईल.

**रामनाथ**—तुमच्या तंबाखूचा काय भाव आहे ?

**नावाडी**—महाजनाची परवानगी चांगली तंबाखू सात रुपये मण नरम पांच रुपये मण देण्याची आहे.

**रामनाथ**—सर्व तंबाखू मिळून किती होईल ?

**नावाडी**—वीस हजार मण.

**रामनाथ**—त्यांत चांगली तंबाखू किती व मध्यम किती ?

**नावाडी**—सर्व चांगलीच आहे. खालची दोन हजार मण तंबाखू किडा लागून बिघडली आहे.

ह्या भावांत व कलकत्याच्या भावांत परमान्तर पाहून रामनाथाला फार आनंद झाला व त्यानें सौदा ठरविण्याचा विचार केला. त्याजपाशीं तीनच रुपये होते. त्यानें मनाशीं विचार केला कीं दोन रुपये विसाराकरितां देऊन एकच रुपयामध्यें कलकत्यापर्यंत कसें तरी करावें. मग तो त्या नावाड्यास ह्मणाला " सौदा पक्का करणारा कोणी तुमच्या मालकाचा गुमास्ता असल्यास बोलवा ह्मणजे सौदा नक्की करितां येईल." नावाड्यानें दुसऱ्या नावेवरून गुमास्त्यास हाक मारिलें. रामनाथानें त्यालाही भाव विचारिला. पूर्वीं नावाड्यानें सांगितलेलाच भाव गुमास्त्यानें सांगितला. मग रामनाथ ह्मणाला " बरें तर तुमचा आमचा सौदा कायम झाला. विसाराकरितां घ्या दोन रुपये. सौदा पक्का ठरल्याची पावती आह्मांला लिहून द्या. कलकत्यास पोंचल्यावर माल उतरून घेऊन पैसे चुकते करूं."

त्यावर गुमास्ता ह्मणाला " बाबूसाहेब एवढ्या किंमतीच्या मालाला दोन रुपये विसार ? विसार एवढ्यानें नाहीं भागत."

**रामनाथ**—बाबूसाहेब, विसार हा भलेपणावर आहे पैशावर नाहीं. शिवाय आपणाला कलकत्त्याला चलावयाचें आहे. तेथें हटखोला घाटावर नाव थांबवा. मी आपल्या रुपयाची भरती केल्यावर माल माझ्या स्वाधीन करावा. मी तसें न केल्यास आपण दुसऱ्याशीं सौदा ठरवावा.

माझे विसाराचे रुपये वाया जातील. बरं आतां लवकर पावती लिहून द्या. मी हटखोला घाटावरील नंबर ···च्या दुकानीं आहे.

गुमास्त्यानें किंचित् विचार करून विसाराचे रुपये घेतले व पावती लिहून रामनाथाला दिली. पावती दिल्यावर गुमास्ता ह्मणाला " बाबू, आपलें तेथें दुकान आहे ? "

**रामनाथ**—होय, माझ्या नातेवाईकाचें तेथें दुकान आहे.

ह्यावेळीं दहा वाजण्याचा सुमार होता. रामनाथानें तेथेंच स्नान, भोजन वगैरे आटोपून थोडासा तंबाखूचा नमुना हातांत घेऊन कलकत्त्याकडे निघाला. रामनाथ जातां जातां त्यास ह्मणाला " कलकत्त्याला होईल तितकें लवकर पोंचण्याचें करा. "

रामनाथ चालत असतां वाटेंत त्याच्या मनांत नाना प्रकारचे कल्पनातरंग उद्भवून तो मनोराज्यांत मग्न झाला. रामनाथ आपल्याच नादांत धुंद होता. जसजसा दिवस कमी कमी होत चालला तसतसा रामनाथ ठिकाणीं पोंचण्याबद्दल मनांतून जास्त आतुर होऊं लागला. यावेळीं ज्या वेगानें तो जात होता त्याच वेगानें तो पहिल्यापासून चालता तर तो केव्हांच पोंचता. रामनाथाप्रमाणें सूर्यालाही लवकर चालण्याची घाई झाली होती. सूर्य व रामनाथ या दोघांत कोण लवकर आपल्या ठिकाणीं पोंचतो याची चढओढ लागली होतीसें दिसलें. पहातां पहातां सूर्य अगदीं अस्ताचलासमीप येऊन पोंचला. यावेळीं त्याचे किरण चार पांच घटकेपूर्वीप्रमाणें प्रखर नव्हते. आतां त्याच्यावर लहान लहान ढगही आक्रमण करूं लागले. कोणी त्याच्या सभोंवतीं फिरत होते. कोणी त्याच्या किरणप्रकाशांत येऊन निरनिराळ्या प्रकारचे रंग दाखवीत होते. इतक्यांत सूर्य अस्तंगत झाला. सूर्यास्तानें पृथ्वीवर नानाप्रकारचे रंग ढंग होऊं लागले. थंड असा वारा वाहूं लागला. सृष्टीनें मोहिनीरूपाचा अंगिकार केला. परमपवित्र गंगानदी अभिसारिकेच्या वेषानें आपला प्रियकर समुद्र यास भेटण्याकरितां नटत मुरडत क्रीडा करीत जात होती. तिकडे रोहिणी आपला

प्रियरमण निशाकर याच्या आगमनाकरितां चमकत चमकत त्याची मार्गप्रतिक्षा करीत होती. इकडे चिमण्या दिवसाच्या श्रमाची विश्रांति घेण्याकरितां आपआपल्या घरट्यांत बसून शब्दालाप करीत होत्या. हळू हळू अंधकार पृथ्वीवर आपलें साम्राज गाजवूं लागला. रामनाथ निवाऱ्याची जागा पाहून तेथेंच रात्रभर राहिला.

सकाळ होतोच रामनाथ तेथून निघाला, तों कलकत्याच्या हटखोला घाटावर बारा वाजतां जाऊन पोहोंचला. तेथें गेल्यावर तो आपल्या मामाला भेटला. जेवणखाण झाल्यावर गोष्टी बोलतां बोलतां त्यानें तंबाखूचा विषय काढिला व तो ह्मणाला " तुमचे धनी जर घेतील तर ठीकच आहे नाहींतर दुसरीकडे पाहूं. " रामनाथाचा मामा आपल्या भाच्याची गोष्ट ऐकून आनंदित झाला व ह्मणाला " आमच्या धन्याशीं सौदा करणें मला इष्ट नाहीं वाटत; कारण ही गोष्ट बाहेर कळली ह्मणजे लोभांत अंतर येईल. " रामनाथालाही ती गोष्ट पटून त्यांनीं दुसऱ्या दुकानीं सौदा ठरविला.

---

## भाग बारावा.

कुसुम फार कचाटींत सांपडली आहे, तिजजवळ जे कांहीं रोख पैसे होते ते तर खर्चून गेले. तिजजवळ आतां दोन सल्ले उरले होते; परंतु ते बाजारांत जाऊन विकावे कोणी ? ती कुलीन असल्यामुळें तिनें बाजारांत जाणें योग्य नव्हतें. गयाराम घरचा गबर असल्यामुळें तिला पैसे देऊं शकता. परंतु, त्याची चालचर्या कुसुमला पूर्ण माहीत असल्यानें त्याजवळ शब्द टाकणें तिला बरें वाटेना. कुसुमच्या आईनें जातेवेळेस तिला सांगितलें होतें कीं " जेव्हां तुजजवळ खर्चविषयास उरनार नाहीं त्यावेळेस नावाड्याकडून मला निरोप पाठीव ह्मणजे मला

बनेल तितकें करून तुला पैसे पाठवीन. माझ्या जीवांतजीव आहे तोंपर्यंत मी आपला जीव गहाण ठेवून तुझ्या खाण्यापिण्याची व्यवस्था करीन तुला किमपी दुःख वाटूं देणार नाहीं. " माझ्या पतींनीं मला टाकून दिल्याबद्दल आधींच तिला दुःख वाटत आहे व तशांत मी आपलें दैन्य दाखविलें तर तिला अधीकच वाईट वाटेल. असा विचार करून तिनें मनाचा पक्का निश्चय केला कीं " मरेन पण याचना करणार नाहीं. "

एके दिवशीं सूर्यास्ताचे सुमारास कुसुम उदास चित्तानें आपल्या आंगणांत बसली होती. त्या दिवशीं तिनें कांहीं खाल्लें नव्हतें; ती फक्त जवळच्या आंब्याच्या झाडाचे पडलेले दोन आंबे खाऊन दोन घोट पाणी प्याली होती. इतक्यांत तेथें **गोरी बहू** आली. **गोरी** बहू जातीची कायस्थ होती. तिचें वय पन्नासा जवळ जवळ होतें. तिचा रंग गोरा होता ह्मणून लहानपणापासूनच तिला लोक ' **गोरी बहू** ' असें ह्मणत. त्या गांवांत पुष्कळ जणी गोऱ्या होत्या पण हीच **गो**री बहू या नांवानें प्रसिद्ध होती. **गो**री बहू हें नांव निघतांच कोण व्यक्ति असावी हें लोक तेव्हांच ओळखत.

**गो**री बहू बालपणींच विधवा झाली होती. पण त्याचें तिला दुःख वाटत होतें कीं नाहीं हें कांहीं सांगतां येत नाहीं. गांवांतील वृद्धा स्त्रिया ह्मणत कीं ' ही अखंड सुवासिनी आहे. पती मेला पण त्याचें तिला कांहीं वाटलें नाहीं. त्याच्या मरणानें हिनें आपला शृंगार कमी केला नाहीं व वैधव्यही मनांत आणिलें नाहीं. ' असो. जास्ती विनोद करण्याचा हा प्रसंग नाहीं.

**गोरी** बहू अंतःकरणाची फार कोमल होती. तिला परदुःखही पहावत नसे. नवऱ्यांनीं टाकिलेल्या व बालविधवा दुःखी स्त्रियांना तर ती फार साह्य करी. खोदून खोदून विचारून, पोटांत शिरून ती त्यांवर उपकार करी. या कामाचा तिनें विडाच उचलला होतेसें वाटतें.

**गो**री बहू तेथें येतांच ह्मणाली " अग मुली, आज तुझें तोंड कां इतकें उतरलें आहे ? आज तूं कांहीं खाल्लें नाहींस ? पहा तोंड किती सुकून गेलें आहे. काय हकीकत आहे ती तरी मला सांग. "

तिला पाहून कुसुम ह्मणाली " कोण ! गोरी बहू ! या, बसा. आज कोणीकडे वाट चुकून आलात ? "

**गोरी०**—काय बसूं ? तुला पाहून मला भडभडून येतें. तुला माझ्या गळ्याची शपथ आहे खरें सांग आज तूं कांहीं खाल्लें कीं नाहीं? पहा डोळे किती खोल गेले आहेत. तोंडावरचें तेज तर पळालेंच. खरें न सांगशील तर बघ.

**कुसुम**—कांहीं खाल्लें आहे तर ?

**गोरी०**—काय खाल्लेंस ?

**कुसुम**—नशिबानें मिळालें तें खाल्लें.

**गोरी**—पण तें सांगशील तर खरी. मला वाटतें तूं कांहीं खाल्लें नाहींस.

कुसुमनें आपल्याशीं विचार केला कीं इला माझी किंव येते ह्मणूनच इतकें ती विचारीत आहे. ती ह्मणाली " ह्या समोरच्या झाडाचे दोन आंबे गळून पडले त्यांचे पन्हें करून मी प्यालें. "

**गोरीबहू**—अग राक्षसासारखा मोठा दिवस पन्हें पिऊन हा कंठला जाणार आहे. तूं सुकुमार लावण्यलतिका. तुझे दिवस असे जावेत याचें मला मोठें वाईट वाटतें. हे घे दोन रुपये आणि कर कांहीं खाण्यापिण्याची तजवीज.

कुसुम आश्चर्यचकित होऊन ह्मणाली " रुपये कशाला ? "

**गोरीबहू**—तुझी स्थिति कांहीं छपून रहात नाहीं, गयाराम तुझा आत्मीयच असून कोणी परका नाहीं. तो दुसऱ्यांवर उपकार करतो आणि तूं तर आपली. पण कांहीं सांगितल्याशिवाय त्याला कसें कळावें. हे पहा त्यानें आज मजजवळ दोन रुपये देऊन सांगितलें कीं " हे तिला दे व जेव्हां गरज पडेल तेव्हां अनमान न करितां मला कळवीत जा असें तिला सांग. " मी तुजकडे येत जाईन.

**कुसुम**—मी कोणाचे फुकट बक्षिस रुपये घेणार नाहीं. मजजवळ

एक दोन जिन्नस आहेत ते विकून मला त्याचे रुपये दिल्यास मी घेईन.

**गोरीबहू**—आपल्या ठिकाणीं असा भेद मानूं नये. बरें तुझ्या ह्मणण्याप्रमाणें कां होईना. ते जिन्नस संपले ह्मणजे मग तर नाहींना कांहीं तुजजवळ उरत. मग तुला गयारामाशिवाय कोणी नाहीं. त्याजजवळ मुबलक पैसा आहे. विचार केला तर तुला तरी कोण आहे ? येऊन जाऊन काय तो रामनाथ. तो वागावा तसा वागला नाहीं. तो कोठें तरी भटकत असेल. येथें असून तरी तो काय करता ? ज्याला स्वतःचेंच पोट भरण्याची भ्रांत तो तुला काय खायला देता ! अग तुझे हे सुखांत रुळण्याचे दिवस ते तूं अशी घालवितेस. गयारामाला ( परमेश्वर त्याला चिरायू करो. ) तुझी फार दया येते. परमेश्वर साक्ष मी त्याच्या पाठीमागें बोलते आहे, त्याच्यासारखा दयाळू कोणी नाहीं. तुला कांहींच ठाऊक नाहीं व तुझें दुःख पाहून त्याला फारच वाईट वाटतें. त्यानें पुष्कळ दिवसांपूर्वी तुजकडे येण्यास सांगितलें पण मला फुरसत झाली नाहीं. आज तर त्यानें माझ्या खनपटीस बसून मला इकडे पाठविलें व सांगितलें कीं "ती जर मला आपला ह्मणून मानील तर मी तिला फुलाप्रमाणें ठेवीन. कोणच्याही गोष्टीची तिला वाण पडूं देणार नाहीं—"

कुसुमच्या मनांत पूर्ण प्रकाश पडला. क्रोधानें ती संतप्त होऊन ह्मणाली " पुरे पुरे आपला हेतू पूर्ण कळला—जा येथून व फिरून मजकडे येऊं नका. हे रुपये देऊन मला दागिन्यांची लालूच लावतेस होय कुंटिणी ? " इतकें ह्मणून कुसुम तेथून उठून चालती झाली. इकडे गोरीबहूला तें तिचें भाषण सहन न होऊन ती रागानें फणफणत चालती झाली. जाताना ती ह्मणाली " बरें ठीक आहे. पहातें तुझें पातिव्रत्य. "

गोरीबहूनें गयारामास सर्व इत्थंभूत हकीकत सांगितली. ती ऐकून तो ह्मणाला " प्रथम प्रथम ती असेंच करील तरी तुह्मी आपला प्रयत्न सोडूं नका. पैशाची लालूच मोठी कठीण आहे. ज्याजवळ पैसा नाहीं त्याला तर रुपयांचा मोह निःसंशय पडावयाचा. तुह्मी प्रयत्न चालूं ठेवा

ह्मणजे ती होऊनच नाचत इकडे येईल. पैशानें देव वश होतात मग मनुष्यांचा काय पाड ? तुमच्या खटपटीबद्दल मी तुह्माला योग्य पारितोषिक देऊन खुष ठेवीन. ”

त्यावर गोरीबहू ह्मणाली “ आहों मी ती हातची शिकार कां जाऊं देंने ! मोठ्या मोठ्या मी ह्मणविणाऱ्या पतिव्रता गेल्या ही तर कालची तरणी पोर. ओंजारून गोंजारून इला ताळ्यावर आणण्याला किती उशीर ?

याप्रमाणें त्याविषयीं गोष्टी बोलून गोरीबहू गयारामाच्या घरून आपल्या घरीं गेली.

## भाग तेरावा.

रामनाथ आपल्या पूर्णचंद्र मामाला बरोबर घेऊन सौदा ठरविण्याकरितां बाजारांत गेला. एका सौदागरानें विचारिलें “ आपल्याजवळ तंबाखू किती आहे व ती काय भावानें द्यावयाची ? ”

**रामनाथ**—वीस हजार मण तंबाखू आहे. ती सर्व चांगली असून ती पैकीं दोन हजार मण जरा नरम आहे. आपणास उत्तम बारा रुपये भावानें व नरम दहा रुपये भावानें सर्व माल घेतल्यास मिळेल. किरकोळ विक्रीचा हा भाव नाहीं.

**सौदागर**—मी सर्व घेईन पण भाव जरा नीट सांगितला पाहिजे. नमूना दाखवा पाहूं. ( नमुना पाहून ) बरें उत्तम अकरा रुपयांनीं व नरम नवांनीं देत असल्यास घ्या रुपये मोजून.

**रामनाथ**—इतकी कांहीं सवलत देतां येत नाहीं. तुह्मी सांगितलेल्या भावांत आठ आठ आणे चढवून सर्व माल घेणें असल्यास सौदा ठरला. ह्या भावांनीं पुष्कळांनीं आह्मांस माल मागितला आहे पण आह्मी त्यावेळीं त्यांना दिला नाहीं. शिवाय आमच्या तंबाखूच्या तोडीची तंबाखू उभ्या बाजारांतही मिळणार नाहीं.

रामनाथानें सांगितलेला भाव मंजूर झाला. त्यावर सौदागर ह्मणाला " अच्छा, माव आमच्या घांटावर आणावी "

रामनाथानें नावा त्या घाटावर नेल्या. वजनमाप सुरूं झालें. माल पुरे वीस हजार मण भरला. रामनाथानें रुपये घेऊन नाववाल्यास जितके द्यावयाचे तितके दिले. या व्यापारांत रामनाथाचा नऊ हजार रुपये नफा झाला.

एका दिवसांत रामनाथाला बोलतां बोलतां नऊ हजार रुपये नफा होणें सहज गोष्ट नाहीं. ईश्वर देऊं लागला ह्मणजे हजार हातांनीं देतो ह्मणतात तें ह्यालाच.

रामनाथ आपल्या मामास ह्मणाला " हे रुपये दुकानांत घालून धंदा करण्याची माझी इच्छा आहे. तुमच्या पाहण्यांत एखादें चांगलें सोयीचें दुकान असेल तर तें मला ठरवून द्या ". त्याच्या मामानें आपल्या कसोशीनें एक दुकान दरमहा पन्नास रुपये भाडें ठरवून त्यावर एक वहिवाटलेला गुमास्ता ठेविला. येणेंप्रमाणें रामनाथाचा धंदा चालूं झाला. त्याचा मामा रोज त्यास भेटून त्याशीं सल्लामसलत करी. रामनाथाच्या मनांतून आपल्या मामाला आपल्या दुकानींच ठेऊन घेण्याचें होतें; परंतु त्याचा मामा ह्मणाला " होता होईल तों मी तुला मदत करण्यांत अंतर करणार नाहीं. परंतु तुझ्या दुकानीं राहणें मला इष्ट नाहीं वाटत. आप्तइष्ट मंडळींत घेवदेव करणें अथवा नौकरीपेशानें राहणें योग्य नाहीं. जे कोणी असें करतात त्यांना पाठीमागून पश्चात्ताप होतो व ते मग आपल्या पूर्वीच्या स्नेहाला व नात्याला मात्र मुकतात. एवढ्याकरितां लांब राहून जें कांहीं मला तुझें काम करितां येईल तें मी करीन". पूर्णचंद्र या ह्मणण्याप्रमाणें रामनाथाशीं सलोख्यानें वागला. रामनाथानें आपला धंदा सचोटीनें व नेकीनें चालविला ह्मणून थोड्याच दिवसांत त्याची महाजन मंडळींत चांगली साख बसली व त्याचा धंदा चांगला चालूं लागला. रामनाथ आपल्या धंद्यांत इतका निपुण झाला कीं, त्याची प्रशंसा जुनी, कसलेली व्यापारी मंडळीही करूं लागली.

थोड्या दिवसांनीं रामनाथानें घेतलेल्या दुकानाच्या अर्ध्या भागांत एक जमीदार तीस रुपये भाड्यानें राहिला. अनुकूल दिवस जेव्हां येनात तेव्हां प्रतिकूल कामही नीट होतें. दैव अनुकूल असतां कोणतेंही काम केलें ह्मणजे यांत नफाच होतो. मुख्य गोष्ट ही कीं, भाग्य हें प्रधान आहे. दिवस अनुकूल असले ह्मणजे आपोआपच चांगल्या गोष्टी सुचून आपलें काम चांगल्या रीतीनें पार पडतें आणि जेव्हां प्रतिकूल दिवस येतात तेव्हां सुयंत्रित कार्यही बिघडून जातें. ज्या लोकांचा भाग्यावर विश्वास नाहीं त्यांनीं पृथ्वीमध्यें हरहमेश घडून येणाऱ्या या गोष्टींचा नीट विचार करावा ह्मणजे भाग्य हेंच सृष्टीचें कारण होय अशी त्यांची खात्री होईल.

कसेंही असो. रामनाथाचें दैव चांगलें फळफळत होतें. प्रत्येक गोष्टींत त्याचें चांगलेंच होत असे. या स्थित्यंतराबरोबर त्याच्या स्वभावांतही फरक पडला होता. तो आतां पूर्वींचा रामनाथ राहिला नव्हता असें ह्मटलें तरी चालेल. त्याच्या पूर्वींच्या सर्व वाईट खोडी जाऊन त्या ऐवजीं सद्गुणांचा वास झाला होता. त्याच्या अंगप्रत्यंगांत भिनून गेलेला त्याचा दुष्ट स्वभाव आतां जाऊन त्या ठिकाणीं सुस्वभाव भरला होता. त्याबरोबर दया, माया, पापभीरुत्व, परोपकार व नम्रता हीं त्याला प्राप्त झालीं. पूर्वींच्या कृत्यांचें स्मरण होउन पश्चात्तापानें त्याचें अंतःकरण रात्रंदिवस जळून जाई. आपल्या जन्मदात्या पित्याच्या आज्ञेचें उल्लंघन करून त्याला अनेक प्रकारें दुःख व कष्ट भोगावयास लाविलें, आपली बहीण दामिनी इच्या सांगण्यावरून आपल्या विवाहित स्त्रीचा मीं त्याग केला, तिला कुलटा समजून निष्ठुरतेनें मारहाण करून इकडे मीं निघून आलों या गोष्टी वरचेवर त्याचे मनांत येऊन त्याचें हृदय व्याकुल होऊन जाई. विंचवाच्या नांगीच्या फणकाऱ्याप्रमाणें त्याला वेदना होत. जोंपर्यंत रामनाथ आपल्या कामांत गुंतलेला असे आणि जेव्हां चार मंडळी त्याजजवळ असत तोंपर्यंत त्याचें चित्त स्वस्थ असे. परंतु तो जेव्हां एकटा असे तेव्हां चिंता त्याच्या मनावर आपलें साम्राज्य चालवी.

एके दिवशीं रामनाथ चिंतातुर होत्साता उदासीन असा बसला होता इतक्यांत मधुर गायनाचा ध्वनि त्याचे कानीं आला—

**निन्दति चन्दनमिन्दुकिरणमनुविन्दति खेदमधीरं । व्यालनिलयमिलनेन गरलमिव कलयति मलयसमीरं ॥ १ ॥ सा विरहे तव दीना । माधव मनसिजविशिखभयादिव भावनया त्वयि लीना ॥ ध्रु० ॥**

**अविरलनिपतितमदनशरादिव भवदवनाय विशालं । स्वहृदयमर्मणि वर्म करोति सजलनलिनीदलजालं ॥ २ ॥**

**कुसुमविशिखशरतल्पमनल्पविलासकलाकमनीयं ॥ व्रतमिव तव परिरम्भसुखाय करोति कुसुमशयनीयं ॥ ३ ॥**

**वहति च चलितविलोचनजलधरमाननकमलमुदारं । विधुमिव विकटविधुन्तुददन्तदलनगलितामृतधारं ॥ ४ ॥**

**विलिखति रहसि कुरंगमदेन भवन्तमसमशरभूतं । प्रणमति मकरमधो विनिधाय करे च शरं नवचूतं ॥ ५ ॥**

**प्रतिपदमिदमपि निगदति माधव तव चरणे पतिताहं । त्वयि विमुखे मयि सपदि सुधानिधिरपि तनुते तनुदाहं ॥ ६ ॥**

**ध्यानलयेन पुरः परिकल्प्य भवन्तमतीवदुरापं विलपति हसति विषीदति रोदिति चञ्चति मुञ्चति तापं ॥ ७ ॥**

**श्रीजयदेवभणितमिदमधिकं यदि मनसा नटनीयं । हरिविरहाकुलबल्लभयुवतिसखीवचनं पठनीयं ॥ ८ ॥**

ह्या गीताचा रामनाथाला अर्थ जरी कळला नाहीं तरी तें त्याला फार प्रिय वाटलें. हें गीत कोणीं गाइलें हें समजून घेण्याची त्याला इच्छा झाली. विचारपूस करितां त्याला कळलें कीं ज्या जमीदारानें अर्धें दुकान भाड्यानें घेतलें आहे त्याचेंच येथें कोणी गात आहे. सूर्य अस्ताचलास जात होता. रामनाथ इकडे तिकडे फिरत असतां त्यानें दुसऱ्या बाजूस एक मनुष्य पाहिला. तो मनुष्य तीस बत्तीस वर्षांचा असून त्याचा वर्ण सांवळा होता. तो साधारण आडव्या अंगाचा असून आपल्याच नादांत गात बसला होता.

रामनाथाला पाहून तो उभा राहिला व भाविकरीतीनें त्याच्याशीं गोष्टी बोलूं लागला.

यावेळीं वाचकवर्गास त्या व्यक्तीचा आह्मी जास्त परिचय देतों.

त्याचें नांव अतुलचंद्रमित्र आहे. जात कायस्थ. पवना जिल्ह्यांत एक गांव आहे तेथील रहिवासी. यांची बी. ए. ची परीक्षा पास होऊन दोन वर्षे झालीं होतीं. ते कलकत्यांत कायद्याचा अभ्यास करण्याकरितां आले होते.

अतुलचंद्र यांची सभ्यरीतीची वागणूक आहे. तसेंच त्यांनीं आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यानें व अखंड परिश्रमानें जितक्या परीक्षा दिल्या त्यांमध्यें त्यांचा पहिला नंबर येत जाऊन त्याना स्कॉलरशिप्‌सुही मिळत होत्या.

---

## भाग चौदावा.

पोटाची आग मोठी वाईट; तिच्यामुळें सर्व जग विह्वल होतें. पोटाची खांच भरण्याकरितां पायानें चालून चालून पायांचे तुकडे तुकडे पडतात, लिहितां लिहितां हात थकून जातात, विचार करितां करितां डोकें फिरून जातें, पैसा मिळवितां मिळावितां मनुष्य पाप्याचा पितर बनतो. इतकी धांवाधांवी, यातायाती, हाणामारी, देणेंघेणें सारें पोटाचे करितांच या जगांत घडतें. बोलण्या बोलण्यांत खोटें बोलणें, शाठ्य दाखविणें, विश्वासघात करणें, निष्ठुर होणें व याहून अधिक अशा गोष्टी केवळ पोटासाठींच होतात. पोटाचीच जर चिंता नसती तर सर्व लोक आळशी होऊन जाते. मग इतकें बुद्धिचातुर्य लढविणें व कर्मधर्मांत मग्न होणें या गोष्टी घडल्या नसत्या. जगांमध्यें ज्या गोष्टी आपण अवलोकन करितों त्या दृष्टींसही न पडत्या. मोठ्या मोठ्या कठीण विद्या व मोठीं दुर्गम शास्त्रें कोण पढतें ? नवीन नवीन कारखाने कशाला होते ? पोटच

नसतें तर या जगांतील तमाशे, रागरंग इत्यादि गोष्टींची कोणाला गरज पडती. श्रीमंत, गरीब, राजा, प्रजा हा भेद न राहता. फौजफाटा, किल्ले लढाया न होत्या. पोटच नसतें तर बिनपोटाचें जग कसें असतें कोण जाणे.

पोटाच्या काळजीनें कुसुम फार विवश व व्याकूळ झाली होती. कुसुमजवळ जे दोन चार दागिने होते ते आपल्या शेजारणीपाशीं ठेऊन तिनें इला रोज खाण्यापिण्याच्या वस्तु पुरवाव्या असें ठरविलें. हाय ! या गोष्टीचा सुगावा गयारामास लागतांच तेथूनही कुसुमचें अन्नपाणी त्यानें बंद केलें. असें केल्यानें ती आपल्या हातांत येईल असें त्याला वाटत होतें. ह्मणूनच पूर्वी गोरीबहुला त्यानें पाठविली होती. परंतु, चुचकारून पुचकारून जेव्हां ती वळत नाहीं असें पाहिलें तेव्हां त्यानें हा उपाय योजिला.

परंतु सती कुसुम इतकी सहनशील होती कीं, या गोष्टीनें ती यत्किंचितूही डगमगली नाहीं. पातिव्रत्यरक्षणाबद्दल पूर्वीपेक्षाही दृढ व अचल अशी तिची प्रतिज्ञा झाली. प्रथम तिनें कांहीं न खाता मरण्याचें मनांत धरिलें होतें. परंतु हें घडलें नाहीं. शिवाय आत्महत्या करण्यांत पाप आहे व आत्महत्येमुळें परलोकींही नरकामध्यें जाऊन यातना भोगाव्या लागतात हें कुसुम पक्केपणीं जाणत होती.

शिधासामुग्री बंद होतांच कुसुम आम्रादि झाडांचीं जीं कांहीं फळें मिळतील त्यांतच संतोष मानून उदरपोषण करी. हळू हळू तो तिचा अभ्यास वाढून ती नुसत्या फलाहारावर राहूं लागली. मग तिनें एकच वेळा खाण्याची संवय लावून घेतली. कांहीं दिवसांनीं एक दिवस फलाहार तर एक दिवस नुसतें जलपान असा क्रम तिनें चालू ठेविला. मग तिनें झाडांच्या पानांवर गुजारा करण्याचा अभ्यास आरंभिला. ती आतां दोन तीन दिवस कांहीं न खातां राहतें. या उपासमारीच्या अभ्यासानें दिवसेंदिवस ती अशक्त होत जाऊन हिंडणें फिरणेंसुद्धां तिला कठीण पडूं लागलें.

आपल्या पतीनें आपणास धि:कारून, अश्राव्य अशा शब्दांचा वर्षाव करून त्यागिलें तरी त्याबद्दल ती आपल्या मनांत पतीवर रागावली नाहीं. ती ह्मणे यांत त्यांचा कांहीं दोष नाहीं. हा सर्व माझ्या पूर्वार्जित कर्माचा दोष आहे. असें नसतें तर मी त्यांच्याशीं खऱ्या भावानें वागावें व त्यांनीं मला त्यागावें असें न होतें. मीं कांहीं कोणाचें वाईट केलें नाहीं; पण कोणा मागील जन्मींच्या वैऱ्यानें सूड घेण्याकरितां त्यांच्या मनांत भलभलतें भरवून देऊन माझी अशी दुर्गति करविली. ते भोळे असल्यानें त्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून त्यांनीं मला त्यागिलें व आपण चालते झाले. हें माझ्या फुटक्या नशीबाचें फल. मी कायावाचामनेंकरून जर शुद्ध आहें तर आज नाहीं उद्या हें माझें नष्टचर्य संपेल व माझे प्राणपति मला लाभतील. माझा छल करणारांची माझ्या देखत दशा दशा होईल.

इकडे कुसुम याप्रमाणें कालक्रमणा करीत होती व तिकडे गयाराम आपली वासना पूर्ण करून घेण्याच्या खटपटींत होता. छल करून ती बधत नाहीं असें पाहून त्यानें बलात्कार करण्याचा विचार केला. बलात्काराचा विचार त्यानें मनांत आणिला खरा; परंतु कुसुमची दृढता, सहनशीलता व निर्लोभता पाहून त्याची बुद्धि थक्क झाली होती. अशा प्रकारची हालअपेष्टा भोगत असतां लोभ, दागिने व सुख यांना लाथ मारून धर्म कायम राखणें कुसुमचें काम होय. व ह्मणूनच तिजवर बलात्कार करण्यास तो एकाएकीं धजावेना.

एके दिवशीं गयाराम मदिरापान करून उन्मत्त होत्साता रामनाथाच्या घरावरून जात होता. घराचें दार उघडें आहे असें त्याचें दृष्टीस पडलें. दार उघडें पाहून त्याचें अंत:करण प्रसन्न झालें. तो चटकन् घरांत शिरला व आंतून दाराला कडी लावून घेतली.

कुसुमला गाढ झोंप लागली होती. एका कोनाड्यांत मिण मिण करीत दिवा जळत होता. उपासमार, दु:ख, छल व चिंता यांनीं जरी ती कृश झाली होती तरी तिचें तेज कमी झालें नव्हतें. ती अजूनही सोन्याप्रमाणें चमकत होती.

तिला पाहून गयारामानें एक झोंकाडा खाल्ला व त्या झोंकाड्यासरशीं त्याचा नशा किंचित् उतरला. त्याच्या मनांत कांहीं चेतना उत्पन्न झाली अथवा सदसद्विवेकबुद्धीनें त्याला थप्पड देऊन सांगितलें कीं ' नीचा, तूं कसली इच्छा करतोस ? त्याचें फल काय आहे त्याचा विचार कर. ' जणो नरकाचा भयंकर देखावा त्यापुढें येऊन त्यानें आपले डोळे मिटले. डोळे मिटतांच एक कृष्णवर्णाची भयंकर मूर्ति लाल वस्त्र परिधान करून व हातांत एक काठी घेऊन त्याजकडे येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या मूर्तीच्या मोठमोठ्या डोळ्यांतून विस्तवाच्या ठिणग्या पडत आहेत, अंग ज्वालांनीं पोळत आहे व कुसुम आपले केस विखरून रक्तानें भरलेलें एक खापर हातांत घेऊन त्या मूर्तीकडे पाहून खो खो हंसत आहे, ओरडते आहे व उड्या मारीत आहे. गयारामानें चटकन आपले डोळे उघडले. चहूंकडे तो आपले डोळे फाडफाडून पाहूं लागला पण त्याच्या कांहीं दृष्टीस पडलें नाहीं. त्याच्या समोर कुसुम घोरत पडली होती.

गयारामाला नशा फिरून पूर्ववत्च चढला. तो उन्मत्त होऊन गेला. त्याला मागचा पुढचा कांहीं विचार राहिला नाहीं. त्यानें चट्दिशीं कुसुमचा हात पकडला. हात पकडतांच दचकून कुसुम जागी झाली व दुष्ट गयाराम आपल्यापुढें आहे हें तिनें पाहिलें. त्याच्या हातून सुटणें मोठें कठीण काम होतें. आतां काय करावें हा विचार ती करूं लागली. तिनें सतीपणा व प्राण हीं सदसद्विवेकबुद्धिरूपीं ताजव्यांत तोललीं. तो सतीपणा फार जड भरला. तिनें विचार केला कीं, जर मी ओरडाओरड करीन तर जवळ कोणी नाहीं व आहेत तीं गयारामानें सुवर्णप्रयोगानें भारलेलीं; ह्मणून ओरडाओरड करणें उचित नाहीं. तिनें जोरानें हात सोडविण्याचा प्रयत्न केला पण दोघांत किती अंतर. ती निःशक्त व गयाराम मदोन्मत्त. ती हात सोडवूं शकली नाहीं. गयाराम हंसून ह्मणाला " सखी, घाबरूं नकोस. मी थोडाच तुझा प्राण घेतों. भितेस कां अशी ? "

तेव्हां कुसुम गयारामाच्या पायावर पडून मोठमोठ्यानें विलाप करून रडूं लागली. तीं ह्मणाली " मी पातिव्रत्याची भिक्षा मागते ती द्या. माझा धर्म भ्रष्ट करूं नका. तुह्मी माझ्या पित्यासमान आहां. मी आपली गरीब मायीसारखी मुलगी आहे, मला सोडा. "

या कुसुमच्या भाषणानें आणि विलापानें गयारामाचें अंतःकरण यत्किंचित्‌ही द्रवलें नाहीं किंवा त्याच्या चित्तांत इहलोक व परलोक याचें भयही आलें नाहीं. तो हंसून ह्मणालाः—

" तुझ्या सारखी बावळी पोर मीं नाहीं पाहिली. मजजवळ जर तूं राहशील तर तुला सोन्यानें मढवून टाकीन. तुला खाण्यापिण्याची काळजी उरणार नाहीं. व्यर्थ कां उपासमार करून दुःख भोगतेस ? तूं मागशील तें मी तुला देईन. फार काय तुझी प्राणापेक्षां अधिक जोपासना करीन. हें पहा इथें तुजकरितां हजार रुपयाचे दागिने आणिले आहेत. रामनाथ तर तुला टाकून गेला आहे. तो आतां तुझी विचारपूसही करणार नाहीं. आणि जरी त्यानें तुझी विचारपूस केली तरी सात जन्मसुद्धां इतके दागिने तुझ्या दृष्टीस पडणार नाहींत. मीं आणिलेल्या या दागिन्यांचा स्वीकार कर. " असें ह्मणून गयारामानें तिच्या पुढें दागिने ठेविले.

कुसुमनें त्यांकडे दृष्टिसुद्धां केली नाहीं. ती रडत रडत ह्मणाली " पहा मी अनाथ गाय आहें. मला दागिन्याची व पैशाची इच्छा नाहीं. माझा धर्म तुह्मी हरण करूं नका. मला चांगलें खाण्यापिण्याची व उत्तम वस्त्रें परिधान करण्याची इच्छा नाहीं. मी गरीबाच्या घरींच जन्मलें असून गरीबाच्याच घरीं पडलें आहें. माझ्या नशीबीं जें कांहीं दुःख भोगणें असेल तें मी भोगीन. देवाब्राह्मणादेखत ज्यानें माझें पाणिग्रहण केलें त्याची मी आहें. माझ्या दैवानुसार तो मला सुख देवो अथवा दुःख देवो ! मी त्याची आहें. इतर पुरुष मला पित्यासमान आहेत. मला सोडा. परमेश्वरानें तुह्मांला धन दिलें आहे. माझ्यासारख्या इतर पुष्कळ स्त्रिया मिळतील. मी अभागी दुःख भोगत राहीन. तुह्मीं घरीं जावें. "

हें सर्व तिनें ह्मटलें; परंतु त्यापासून त्या दुष्टाला कांहींही दया न येतां तो क्रुद्ध होऊन ह्मणाला " तूं सरळपणें वळत नाहींस असें दिसतें. पहा जें मी ह्मणतों तेंच तुला शेवटीं करावें लागेल. अजून सांगतों. हट्ट सोड. माझें ह्मणणें मान्य करून जरा स्वस्थ बैस. हे दागिने घाल पाहूं. "

कुसुमनें पाहिलें कीं रडून, गायावाया करून काम नाहीं होत. ती रागानें हाताला हिसडा देऊन हात सोडवून दूर उभी राहिली. तिचे डोळे लाल झाले, अधर हलूं लागले, डोक्यावरील केस उभे राहिले. धांवत जाऊन दार उघडावें असें तिच्या मनांत आलें ह्मणून दारापर्यंत ती गेली पण दार उघडेना. तेव्हां ती परत आपल्या बिछान्यापाशीं गेली व न जाणे तक्याच्या खालचें तिनें कांहीं पदरांत झांकून घेतलें. तें पाहूनही गयारामानें न पाहिलेसेंच केलें.

फिरून गयाराम तिला पकडावयास धांवला; तेव्हां कुसुम गंभीर स्वरानें ह्मणाली " पहा ! गयाराम, तूं जर आतां मजकडे येशील तर तूं तरी जाशील किंवा मी तरी मरून जाईन— पहा सांगून ठेवतें. "

**गयाराम**—प्यारी, आज तूं व मी एक होणार ह्मणून ह्मणतों हे घ्या—

असें ह्मणत ह्मणत गयाराम कुसुमच्याकडे धांवला व इकडे दिवाही गेला.

---

## भाग पंधरावा.

अतुलचंद्र हे मोठे मिठे बोलणारे आहेत हें पूर्वींच सांगितलें आहे. त्यांच्या संगतीनें रामनाथाला बरें वाटे. त्या दोघांचें इतकें रहस्य जमलें कीं आपआपला कामधंदा होतांच ते एकत्र जमत व इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसत.

प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणाची प्रवृत्ति ईश्वरानें अशी ठेविली आहे

कीं, तिच्या प्रेरणेनें मनुष्य ज्यापाशीं बसतो, ज्याचें भाषण ऐकतो, जी चालचलणूक पाहतो त्यांचें अनुकरण करावेंसेंच त्याला वाटतें. संगतीचा प्रभाव असा आहे कीं, मोठे मोठे चोर, दरोडेखोर व ठग लोक ज्यांचीं अंतःकरणें दगडाप्रमाणें कठीण असे लोक सत्संगानें कोमल अंतःकरणाचे बनतात. पुष्कळ लोक नीच लोकांच्या संगतीस लागून आपल्या सुंदर स्वभावाची नासाडी करून टाकितात व चांगल्या लोकांत बसण्याउठण्यास नालायक होतात. ज्या कुलबधू परपुरुषाशीं काय पण आपल्याकडून मोठ्या दर्जाच्या स्त्रियाशीं बोलण्यास लाजतात त्या वाईट स्त्रियांच्या संगतीनें कुलटा बनून बाजारांत दुकान मांडून वाटेल तें अकर्म करण्यास मागें पुढें पहात नाहींत. ह्या गोष्टी संगतीचेच परिणाम होत. मनुष्याला जशी संगति असावी तसा त्याचा स्वभाव बनतो यांत कांहीं संशय नाहीं.

रामनाथाचीही तशीच अवस्था झाली; अतुलचंद्राच्या संगतीनें व त्याच्या सदुपदेशानें रामनाथाची चालचलणूक त्याप्रमाणें बनली. रामनाथाचे सर्व दुर्गुण जाऊन त्या ठिकाणीं सद्गुणांचा वास झाला. फार काय रामनाथ आतां पूर्वींचा रामनाथ राहिला नव्हता.

रामनाथ व अतुलचंद्र यांचें सर्व विषयावर संभाषण होई परंतु रामनाथ आपल्या अंतर्यामची एक गोष्ट कधीं काढीत नसे. ती गोष्ट रामनाथाचें अंतःकरणास झोंबत होती. अतुलचंद्र याला जरी त्याच्या अंतर्यामची गोष्ट कळली नव्हती तरी त्याला कसली तरी काळजी आहे आणि ह्मणूनच इतकी धनदौलत असतांही तो उदास असतो हें त्यानें पूर्वींच ताडिलें होतें.

याप्रमाणें बरेच दिवस गेले. एके दिवशीं अतुलचंद्रानें रामनाथास विचारिलें, “ मित्रा, अशी कोणची गोष्ट आहे कीं तिच्यामुळें तूं रात्रंदिवस उदास असतोस ? ” रामनाथ तें ऐकून उत्तर देण्यास टाळाटाळ करूं लागला. परंतु अतुलचंद्र ह्मणाला “ अंतर्यामची दुसऱ्याला न सांगण्यासारखी गोष्ट

दुःखदायक असते. ती आंतल्या आंत धुमसत राहते. जो मनुष्य अशी गोष्ट गुप्त ठेवूं इच्छितो त्याला चैन पडत नाहीं. दुसऱ्याला सांगून तो आपलें दुःख वांटून घेतो असें नाहीं. परंतु लोक त्याला हरतऱ्हेनें धीर देऊन त्याच्या अंतर्यामची व्याकुलता हलकी करतात. याकरितां तुझ्या अंतःकरणांत सारखी पेट घेणारी अशी कोणची गोष्ट आहे ती सांग.

अतुलचंद्राचें हें भाषण ऐकून रामनाथ कांहींवेळ स्वस्थ बसला. नंतर कांहीं विचार करून त्यानें आपल्या अंतःकरणांतील सर्व गोष्टी त्याला सांगितल्या. त्या सर्व ऐकून घेऊन अतुलचंद्र ह्मणाला " माझ्या मतें पूर्ण चौकशी केल्याशिवाय एका मनुष्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून आपली स्त्री वाईट चालीची मानणें व तिचा त्याग करणें हा मोठा प्रमाद होय. तूं या गोष्टींची बारिक चौकशी करून मग काय करणें तें करावयाचें होतें. बहिणीच्या सांगण्यावरून आपल्या स्त्रीचा त्याग करणें निव्वळ वेडेपण होय. मला वाटतें यांत कांहीं तरी तिचा गुप्त हेतु असावा. करितां क्षणाचाही विलंब न करितां तूं आपल्या घरीं जा; मग काय होणें असेल तें होवो. "

अतुलचंद्राचें भाषण रामनाथास पटलें. लागलींच त्यानें आपल्या गांवीं जाण्याची तयारी केली व मामास सांगितलें कीं कांहीं जरूरीच्या कामाकरितां मी घरीं जात आहें तरी मी परत येईपर्यंत आपण कामकाज पहावें. त्याच रात्रीं रामनाथानें नाव ठरविली व सामानसुमान नावेवर नेऊन ठेविलें आणि सकाळ होतांच नाव चालू करावयाची हा विचार केला. इतक्यांत एका दूतानें रामनाथास एक चिठी आणून दिली. ही चिठी त्याचा जुना मित्र गोपीनाथ याजकडून आली होती. तींत असा मजकूर होता:—

' आपल्या घरीं मोठा गहजब उडून गेला आहे. हातचें कसलेंही काम तसेंच टाकून इकडे येण्याचें करावें. येवढ्यावरून समजेल. पळाचाही विलंब करूं नये. '

चिठी वाचून रामनाथ घाबरला व त्यानें त्याचवेळीं नाव चालूं करण्यास सांगून जितक्या लवकर नेमलेल्या स्थळीं पोचवितील तितकें चांगलें बाक्षिस मिळेल अशी नावाड्यांस लालूच दाखविली. बक्षिसाच्या आशेनें नावाड्यांनीं नाव ठरविलेल्या वेळेच्या अगोदरच पोंचविली. नाव पोंचली तेव्हां सूर्य अस्तास जाण्याचा सुमार होता. रामनाथ आपलें सामानसुमान व नोकरचाकर यांस तसेच नावेवर ठेवून एकटाच घराकडे निघाला. त्यावेळीं नानाप्रकारच्या गोष्टींची चिन्ता त्यापुढें येऊन तिनें त्याला अगदीं घेरून टाकिलें होतें. चिन्तेनें त्याचें पाऊल जड होऊन त्याच्यानें चालवेना, कसा तरी तो आपल्या घरापाशीं येऊन पोंचला. घराशीं येऊन पाहतों तों दाराला कुलुप आहे. तेथून जवळच गयारामाचें घर होतें त्यालाही कुलूप होतें. हें पाहून तो घाबरला. त्यानें विचार केला कीं " आतां नीट गोपीनाथाचे घरीं जावें. " लाग-लींच तो गोपीनाथाच्या घराच्या रस्त्याला लागला. जातां जातां वाटें-तच त्याला गोपीनाथ आढळला.

रामनाथाला पाहून गोपीनाथ चपापून ह्मणाला " मित्रा, केव्हां आलास ! माझें पत्र पोंचलें ? "

**रामनाथ**—तुझें पत्र काल संध्याकाळीं मिळालें. पत्राचा मनाला जरी नीटसा उलगडा पडला नाहीं तरी मी घाबरून गेलों व लागलीच नाव ठरवून रात्रीचाच निघालो. मला येथें येऊन एक घटका झाली असेल. मी प्रथम आलों तों तडक घराकडे गेलों परंतु दाराला कुलुप ह्मणून गयारामाच्या घरीं गेलों; तेथेंही कुलुप तेव्हां नीट तुझ्या घराचा रस्ता धरला. हकीकत ऐकण्यास मी फार उत्सुक झालों आहें. मला खाण्यापिण्याची वगैरे कांहीं शुद्ध नाहीं. वृतांत सांगशील तेव्हां माझें मन स्थिर होईल.

**गोपीनाथ**—इतका घाबरूं नकोस. घरीं तर चलशील ?

**रामनाथ**—नाहीं. तसें नाहीं व्हावयाचें. अगोदर मला हकीकत सांग.

**गोपीनाथ**—सांगतों. पण चालूं तर लागशील !

**रामनाथ**—घरीं काय अधिक आहे.

**गोपीनाथ**—उतावीळ होण्याची वेळ नाहीं. धीर धर व घरीं चल.

बोलत बोलत ते घरीं येऊन पोंचले. घरीं येताच रामनाथानें हकीकत सांगण्यास गोपीनाथास सांगितलें. गोपीनाथानें एक हुक्का तमाखू भरून रामनाथाला दिल्यावर ह्मणालाः—

" आपली बहिण वारल्याचें तूं ऐकिलेंच असशील. " रामनाथ डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाला " ताई वारली ? केव्हां ? तिला काय झालें ? "

**गोपीनाथ**—तूं गेल्यावर दोनच दिवसांनीं एकाएकीं तिचें तोंड सुजून गेलें व त्याच्या पीडेनें ती ओरडत असे. मग तिच्या सर्व अंगावर फोड उठून त्यांतून पू वाहूं लागला व त्यांत किडे पडले. नंतर चार पांच दिवसांनीं ती मेली. गयारामानें तिचें उत्तरकार्य केलें.

रामनाथाला हें ऐकून फार वाईट वाटलें. तो डोळे पुसून व एक दीर्घ श्वास सोडून ह्मणाला " पुढें ? "

**गोपीनाथ**—दामिनीच्या मरणानंतर गयारामानें तुझ्या स्त्रीवर वांकडी नजर ठेविली. ' गोरीबहू ' कडून तिचें मन आपणाकडे वळविण्याचा त्यानें प्रयत्न केला, पैशाची लालुच दाखविली, जाच जाचणूक केली पण ती कशानेंही वळली नाहीं. कलियुगांत पतिव्रता स्त्री सांपडावयाचीही नाहीं असा माझा समज होता पण तुझ्या पत्नीनें माझी खात्री केली कीं, जगांत पतिव्रता स्त्रिया आहेत. एक दिवस गोरीबहू मला येऊन सांगूं लागली कीं " गयारामाकडून पांचशें रुपये घेऊन मी तिजकडे गेलें व त्यायोगें तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या रुपयांचा तिला यत्किंचितही मोह न पडून ती ह्मणाली ' जा येथून. आग लागो

तुझे रुपयांला. ' " गोरीबहू फिरून एकदां हजार रुपयांचे दागिने घेऊन तिजकडे गेली पण त्याहीवेळीं तिनें तिला धुडकावून लाविलें. मित्रा, पैशांचा मोह न पडणें फार कठीण आहे. धन्य तिची ! गोरीबहूच्या मार्फत आपला हेतु सिद्धीस जात नाहीं असें पाहून गयाराम एके दिवशीं स्वत:च हजार रुपयांचे दागिने घेऊन तिकडे गेला. त्यावेळीं तुझी पत्नी निजलेली होती. गयारामानें तिला जागें करून दागिन्याच्या लोभानें वश करण्याचा यत्न केला, परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. सरळ मार्गांनें ती वश होत नाहीं असें पाहून बलात्कारानें आपली इच्छा तृप्त करण्याचा त्यानें बेत केला. कुसुमनें पाहिलें कीं आपली अब्रु संभाळणें कठिण आहे. तेव्हां तिनें तिजजवळ असलेली एक सुरी घेऊन गयारामावर तिचा वार केला. त्या प्रहाराबरोबर दुष्ट गयारामाचा प्राण निघून गेला—

गोपीनाथाचें हकीगत सांगणें पुरें झालें नाहीं तोंच रामनाथ ओरडून ह्मणाला " हाय हाय ! तिला खून करावा लागला. आतां ती कोठें आहे ! मींच विचार न करितां तिचा त्याग केला. नाहीं तर असा प्रसंग कां ओढवता ? "

**गोपीनाथ**—घाबरूं नकोस; हकीगत ऐकून घे. हकीगत ऐकल्यांवर तिच्या सुटणुकीचा विचार करितां येईल.

**रामनाथ**—बरें, सांग हकीगत.

**गोपीनाथ**—गयाराम मरतेसमयीं मोठ्यानें ओरडला. त्या ओरडण्यानें आसपासचे लोक धांवत आले व त्याची अशी दशा पाहून चालते झाले. दुसरे दिवशीं पोलिसांनीं घरीं येऊन गयारामाचें प्रेत व कुसुम यांना पकडलें. या खुनाची आतां चौकशी होणार आहे. येत्या मंगळवारचा दिवस ठरला आहे. तरी सत्वर दोन वकील घेऊन तूं तेथें हजर हो. पैशाकडे पाहण्याची ही वेळ नव्हे.

हा वृत्तांत ऐकून रामनाथ रडत रडत ह्मणाला " हाय ! अविचारानें

तिला एकटीला येथें टाकून गेलों नसतों तर गोष्ट या थराला कां येती ? हाय ! मी अभागी ! अशी पतिव्रता स्त्री मिळून मीं तिचा नीट सांभाळ केला नाहीं. परमेश्वरा, या पापांतून मी कसा मुक्त होईन ! हे दीनानाथ ! ती निर्दोष सती तुझ्या दयेला पात्र नाहीं काय ?

**गोपीनाथ**—आतां रडून कांहीं काम होणें नाहीं. झालें तें झालें. आलेल्या संकटांतून पार पडण्याचा उपाय शोधिला पाहिजे. मागील गोष्टींचें स्मरण करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**रामनाथः**—मित्रा, मला तर कांहीं सुचत नाहीं; तूं सांगशील त्याप्रमाणें मी करीन.

**गोपीनाथः**—तूं तर लहान मुलासारख्या गोष्टी सांगतोस. जरा आपलेपणांत ये. आपल्या स्त्रीच्या उत्तम चालचलणुकींविषयीं साक्षीदार तयार केले पाहिजेत. **गोरा**बिहूला बोलावून तिला साक्षीदार तयार कर.

**रामनाथः**—त्या दुष्टेचें नांव ऐकून मला क्रोध उत्पन्न होतो. ती माझी साक्षीदार कशी होईल ? या सर्व गोष्टींचें मूळ तीच आहे.

**गोपीनाथः**—अरे त्या गोष्टी आपल्याला काय करावयाच्या आहेत ? आपलें काम साधलें ह्मणजे झालें. रुपया ही अशी अजब वस्तू आहे कीं तिनें सर्व वश होतात. शिवाय आपणाला कांहीं खोटी साक्ष द्यावयाची नाहीं. **गयारामाच्या सांगण्यावरून** जें कांहीं ती **कुसुम**ला ह्मणाली होती तें तिनें कबूल केलें ह्मणजे झालें. याप्रमाणें त्यांच्या गोष्टी झाल्या.

* * *

**रामनाथ गोपीनाथ** आणि **गोरी**बहू हीं तिघें, ज्या नावेंत बसून रामनाथ आला होता, त्या नावेंत बसून चालतीं झालीं.

---

## भाग सोळावा.

पहातां पहातां दिवस निघून गेले; आज मंगळवार आहे व खटल्याचा दिवसही आजचाच. रामनाथ आणि गोपीनाथ यांनीं जिल्ह्याच्या गांवीं जाऊन तेथील उत्तम उत्तम वकील आपल्या तर्फेचे केले. वकिलांनींही रामनाथास पूर्ण विश्वास दिला.

दहा वाजतां रामनाथ आपले वकील व साक्षीदार बरोबर घेऊन कचेरींत हजर झाला. थोड्याच वेळानें कामगार मंडळी आपापल्या स्थानीं विराजमान झाली व त्याचा खटला सुरूं झाला.

जज्ज साहेब नुकतेच विलायेतेहून आले आहेत. त्यांना अजून इकडील भाषा समजत नाहीं. दुभाषी त्यांना सर्व हकीगत सांगतों.

आज कचेरीमध्यें इतकी कांहीं दाटी झाली आहे कीं तेथें मुंगीचाही शिरकाव होणें कठीण. आजचा हा विलक्षण खटला पाहण्याकरितां लहान थोर आदिकरून सर्व लोक आले होते. आंत जागा न मिळाल्यामुळें कित्येक लोक मैदानांत बसले होते, कित्येक झाडावर बसले होते. एकंदरींत जागा म्हणून सांपडेल तेथें लोक बसत होते. सर्वांच्या तोंडून ‘ ईश्वर या सतीचा जय करो ’ असें निघत होतें.

कुसुमचा खटला अगोदर सुरूं झाला. कांहीं वेळानें आरोपीचें नांव पुकारलें. कुसुम लज्जावश होऊन हळूच नम्रतेनें पिंजऱ्यांत येऊन उभी राहिली, रामनाथ, गोपीनाथ व वकील हे आंत गेले. जज्जसाहेबाच्या आज्ञेनुसार दुभाषी विचारूं लागला.

**दुभाषी**—कुसुमकुमारी तुमचेंच नांव काय ?

**कुसुम**—होय, तें माझेंच नांव आहे.

**दुभाषी**—गयारामाचा खून कोणीं केला ?

**कुसुम**—मीं.

**दुभाषी**—कशाकरितां ?

**कुसुम**—आपलें पातिव्रत्य राखण्याकरितां.

**दुभाषी**—पातिव्रत्य राखणें याचा स्पष्ट अर्थ सांगा. तेव्हां रामनाथाचा वकील सांगूं लागला.

" हिंदुधर्मशास्त्रानुसार ज्या पुरुषाशीं मातापितरांनीं लग्न लावून दिलें तोच तिचा पति; त्याच्या शिवाय तिजवर दुसऱ्या कोणाचा हक्क नाहीं. त्याची सेवा चाकरी करण्यांत, त्याची आज्ञा मानून राहण्यांत व त्याला पूज्य मानण्यांत आपला जन्म घालविणें हें त्यांचें कर्तव्य आहे व हें कर्तव्य ज्या स्त्रिया उत्तम रीतीनें बजावतात त्यांस स्वर्गप्राप्ति होते. आपल्या पतीशिवाय पर पुरुषाच्या छायेलाही त्यांना शिवतां येत नाहीं. परपुरुषाशीं बोलणें, हंसणें फार काय पण त्याला आपलें तोंड दाखविणें पाप समजतात. जी अशा रीतीनें वागते तिला मरणांतीं नरकयातना भोगाव्या लागतात. जी स्त्री आपल्या पतीला सोडून पर पुरुषांशीं समागमकरिते तिची समाजांत निंदा होते. समाज तिला बहिष्कृत करतो. मरणानंतर तिला पशुयोनि प्राप्त होते. तिला कुष्ठ भरतें व अनेक प्रकारचीं दुःखें प्राप्त होतात. शास्त्रामध्यें असें लिहिलें आहेः—

**' पतिं या नाभिचरति मनोवाग्देहसंयता ।**
**न भर्तृलोकान् प्राप्नोति सद्भिः साध्वी न चोच्यते ॥**
**व्यभिचारात्तु भर्तुः स्त्री लोके प्राप्नोति निंदताम् ।**
**शृगालयोनिं चाप्नोति पापरोगैश्च पीड्यते ॥'**

**दुभाषी**—या श्लोकांची कांहीं जरूरी नाहीं आणखीं जें काय आपणाला सांगायचें असेल तें सांगा.

**वकील**—मृत गयाराम इचें पातिव्रत्य हरण करूं इच्छीत होता. प्रथम त्यानें तिला रुपये व दागिने यांचा लोभ दाखवून वश करण्याचा यत्न केला. परंतु त्याला यश मिळालें नाहीं म्हणून ती निजली असतांना तो तिच्या घरांत शिरला व बलात्कारानें आपलीइच्छा पूर्ण करून घेण्याचा बेत त्यानें केला.अन्य मार्ग राहिला नसल्यामुळें कुसुम अगदीं घाबरून गेली.आपलें पातिव्रत्य हरण होतें हें पाहून तिनें निरुपायानें सुरी त्याचे पोटांत खुपसली.

**दुभाषी**—अशातऱ्हेनें खून करण्याची कायद्याची आज्ञा आहे काय?

**वकील**—होय. आत्मरक्षणार्थ केलेला थोर अपराध कायद्यानें माफ होतो. इंडियन पिनल कोड मधील......कायदा पहावा.

**दुभाषी**—पातिव्रत्यरक्षण व आत्मरक्षण हीं एकच आहेत काय ?

आत्मरक्षण ह्मणजे स्वतःचें रक्षण करणें. आपल्या प्राणाचें आपण रक्षण केलें नाहीं तर आपण प्राणास मुकूं. पातिव्रत्य हरण झाल्यापासून प्राण कांहीं जात नाहींत, मग हीं दोन्हीं तुह्मी कशीं एक ह्मणतां ?

**वकील**— ( हंसून ) आपला जरा गैरसमज होत आहे. इंडियन पिनलकोड कायदा...कलम तिसरें पहा.

**दुभाषी**—आपलें पातिव्रत्य रक्षण करण्याकरितां दुसऱ्याचे प्राण घ्यावेत असें कां त्यांत लिहिलें आहे ?

**वकील**—होय. हें पहा " जो कोणी आततार्इपणानें जबरदस्तीनें व्यभिचार करण्यास प्रवृत्त होईल इत्यादि... ... ... ... ... ...

आपला सर्व संशय दूर झाला असेल असें वाटतें व हेंही ध्यानांत आलें असेल कीं, आरोपीनें जें कांहीं केलें तें स्वतःचें पातिव्रत्य रक्षण करण्याकरितां केलें व तें कायद्यालाही उजू आहे.

**दुभाषी**—कुसुम ही साध्वी आहे याला पुरावा आहे काय ?

**वकील**—आज्ञा झाल्यास साक्षीदार पुढें करितों.

**दुभाषी**—ठीक आहे. साक्षीदार बोलवा.

वकिलानें प्रथम **गो**पीनाथ व मागुन **गो**रीबहू यांजकडून साक्ष देवविली. **गो**रीबहूनें आरंभापासून शेवटपर्यंत जितक्या गोष्टी **ग**यारामानें **कुसुम**-प्राप्त्यर्थ तिला करावयास सांगितल्या होत्या तितक्या सर्व सांगितल्या.

**गो**रीबहू आपल्या भाषणानें फशीं पडली. तिला असें वाटलें होतें कीं, आपण दिलेले साक्षीबद्दल **राम**नाथास आपण पांचशें रुपये बक्षीस मागूं व ते त्याकडून मिळतील. परंतु तिचे मनचे मांडे मनांत राहून दुसरेंच घडलें. **ग**यारामाच्या बक्षिसास भुलून **कुसुम**चें मन कुमार्गाला प्रवृत्त करण्याचा तिनें यत्न केला होता. त्याबद्दल जज्ज साहेबांच्या हुकुमानें दोन शिपायांनीं तिला पकडून नेलें.

निकाल ऐकण्याकरितां बाहेर लोक फार उतावळे झाले होते. **कुसुम** दोषमुक्त झाली हें ऐकून चोहोंकडून " जय **कुसुम**कुमारीच्या पातिव्रत्याची " हा ध्वनि ऐकूं येऊं लागला. सर्व नगरामध्यें त्या ध्वनीचा प्रतिध्वनि होत आहेसें वाटलें. सर्व लोकांना असा कांहीं आनंद झाला कीं त्यांना अलभ्य वस्तूच लाभली. बाहेर असा हर्ष—कोलाहल, पाहून जज्जसाहेब आपल्या आसनावरून उठले. गर्दी मोडण्याकरितां शिपाई पुढें सरसावले.

बाहेर येतांच आनंदसागराच्या लाटा उचंबळत आहेत असें जज्जसाहे-बांना वाटलें. जज्जसाहेबांना पाहून लोक त्यांचा जयजयकार करूं लागलें. जज्जसाहेब हें पाहून मनांत विस्मित व हर्षित झाले. पातिव्र-त्याच्या जयानें हिंदुलोकांना झालेला आनंद पाहून त्यांच्या अंतःकरणांत नानातऱ्हेचे कल्पनातरंग उमटले. त्यांची कल्पना वाचकांनींच करावी.

इकडे **रामनाथ** आपल्या स्त्रीला बरोबर घेऊन घराकडे निघाला. त्याच्या मागोमाग शिपाईलोकांची बक्षिस मागण्याकरितां गर्दी झाली. न्यायकचेरीच्या बाहेर **रामनाथ** व **कुसुम** येतांच त्यांनीं परस्परांस अवलोकन केलें. एकमेकांस पाहतांच त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रु आले, त्यांचा कंठ दाटून आला व त्यांच्या मुखांतून शब्दही निघेना. कांहीं वेळानें **रामनाथ** ह्म-णाला " प्रिये, मी किती पापी ? माझ्या पापाला सीमा नाहीं. पतिव्रता स्त्रियेचें चरित्र किती वंदनीय व आदरार्ह असतें हें मला आजपर्यंत ठाऊक नव्हतें. त्याचा प्रकाश आज माझ्या मनामध्यें पडला. मीं तुला फार दुःख दिलें आहे. मीं केलेल्या अपराधाची क्षमा ह्मणून मजकडे एकवार स्नेहदृष्टीनें पहा. "

**कुसुम**—छे ! छे ! आपण काय बोलता हें ? मी आपली दासी. माझ्या कर्मानुसार आजपर्यंत दुःख भोगावें लागलें यांत आपणांकडे तिळमात्र दोष नाहीं. आतां येवढीच इच्छा आहे कीं, आपण मला घरीं पोहोंचवा व अंतसमयीं एकवार आपण दर्शन देऊन मला यथायोग्य गति द्या.

याप्रमाणें त्यांचें संभाषण चालू होतें. इकडे बक्षिस मागणाऱ्या लोकांना एकीकडे सारून **गोपीनाथ** **रामनाथा**जवळ आला. **गोरीबहू**ला काय शिक्षा होते हें समजून घेण्याकरितां तो एवढावेळ कचेरींतच होता. **गोरीबहू**स १॥ वर्षांची शिक्षा झाली असें त्यानें **रामनाथा**स सांगितलें.

**रामनाथा**नें ज्या ज्या लोकांस बक्षिस द्यावयाचें होतें त्या त्या लोकांस दिलें. नंतर तो **कुसुम** व **गोपीनाथ** यांसह आपल्या नावेकडे गेला व तेथून ते वसंतपुरास पोहोंचले.

गांवांतील लोकांस त्यांनीं सर्व वृत्तांत कथन केला. खऱ्याचा जय ऐकून त्यांना फार आनंद झाला.

**गयारामाला** कोणी वारस नसल्यामुळें **रामनाथा**सच त्याची संपत्ति मिळाली.

---

## उपसंहार.

ज्या वेळची हकीगत आह्मीं आतांपर्यंत सांगितली तिला आठ वर्षें झालीं आहेत. वाचकहो, एक वार फिरून आपण वसंतपूर पाहून येऊं.

परम पवित्र गंगानदीच्या कांठीं एक सुंदर हवेली बांधली आहे. हवेलीपासून गंगानदीपर्यंत सुंदर घाट बांधला आहे. त्या हवेलीच्या दारावर चौघडा वाजत आहे व दोन्ही बाजूंस पाहरेकरी लोकांचा पहारा आहे.

सूर्य अस्तास जाण्याची वेळ आहे. दिवाणखान्यांत बैठकीवर उच्चासनीं एक जमीदार बाबू बसून गुडगुडी ओढीत आहेत. त्यांच्या जवळ एक मनुष्य बसला असून वर्तमानपत्र वाचीत आहे. इतक्यांत एक नोकर येऊन नम्रपणें मुजरा करून हात जोडून ह्मणाला " महाराज, दवाखान्यांत जी ह्मातारी कुंटीण होती तिचा अंतसमय जवळ आला आहे. आपलें एक वार दर्शन घडावें अशी तिची इच्छा आहे. हुजुर तिच्यावर एवढा अनुग्रह करतील. "

जमीदार बाबू फार दयाळू आहेत. त्याचें भाषण ऐकून ते उठले व दोनचार चौक ओलांडून नजरबागेंतून धर्मार्थ दवाखान्यांत जाऊन पोंचले. त्यांनीं पाहिलें कीं एक रोगी मरण्याच्या बेतांत आहे परंतु अजून शुद्धींत आहे. त्यांना पाहून ती वृद्धा ह्मणाली " रामनाथ, परमेश्वरकृपेनें तूं आतां मोठा गृहस्थ झाला आहेत व अशीच तुह्मी चढती कला असावी असा माझा आशीर्वाद आहे. मी तुझे फार अपराध केले आहेत. मी मोठी पापी आहें माझ्या अपराधांची मला क्षमा कर. तूं मोठा गृहस्थ असतां मीं तुला नावानें हाका मारिलें याबद्दल रागावूं नकोस. " असें बोलतां बोलतां तिच्या तोंडांतून शब्द निघेना. रामनाथानें लोकांकडून तिला अंगणांत आणून ठेविलें व मरणानंतर यथाविधि तिचें उत्तरकार्य केलें.

दिवाणजींनीं रामनाथ बाबूस विचारिलें " ही ह्मातारी कोण ?"

रामबाबूंनीं तिचा सर्व वृतांत त्यांस कथन केला. तो ऐकून दिवाणजी " ह्मणाले असल्या पापिणीवर इतके उपकार कां ? " रामनाथबाबू ह्मणाले " कुसुमचे असेंच सांगणें आहे कीं शत्रु असो कीं मित्र असो सर्वांना येथें थारा मिळावा. तिच्याच नांवानें हें चिकित्सालय केलें आहे. तेव्हां तिच्या ह्मणण्याप्रमाणें वागणें इष्ट आहे. या चिकित्सालयाचें नांव " कुसुमकुमारी धर्मार्थचिकित्सालय " असें ठेविलें आहे. "